


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

अनुक्रमणिका

# *अनुक्रमणिका*



वर्ष ६४ वें    सप्टेंबर-आक्टोबर १९३३    अंक ९-१०

# अस्सल मराठा छंदांचा ऐतिहासिक विचार

[ लेखकः—रा. रा. अ. का. प्रियोळकर, बी. ए. ]

## लेखांक १ ला

## ओवी, अभंग व दण्डी

संस्कृत, प्राकृत, फारसी अशांसारख्या अन्य भाषांतून मराठी भाषेंत जीं वृत्तें घेतलेलीं नाहींत, तीं अस्सल मराठी वृत्तें म्हटलीं पाहिजेत. अभंग, दिंडी, साकी, घनाक्षरी, सवाई, छप्पा, ओवी, कटिबंध, चूर्णिका हे केवळ मराठी छंद, ही वृत्तदर्पणाची[1] समजूत घेऊन त्यांपैकीं ओवी व अभंग खेरीज करून इतर वृत्तांचा उगम कसा परकीय आहे, हें कै. वि. का. राजवाडे यांनीं 'मराठी छंद' या आपल्या लेखांत दाखविलें आहे.[2] दिण्डीचा उगम त्यांस निश्चित सांगतां आलेला नाहीं. परंतु हा छंद महाराष्ट्री या प्राकृत भाषेमधून उचलला असावा, असा त्यांचा तर्क आहे. अर्थात् निश्चितपणें परका म्हणून न ठरलेल्या या छंदाचाही ओवी व अभंग या अस्सल मराठी छंदांबरोबर मी विचार करणार आहें.

१. राजवाड्यांपुढें असलेली ही वृत्तदर्पणाची आवृत्ति कोणती हें कळत नाहीं. जुन्यांत जुनी अशी जी वृत्तदर्पणाची प्रत मला सांपडली, ती इ. स. १८६७ सालची तिसरी आवृत्ति असून तीमध्यें, "केवळ प्राकृत कवितेंत मात्र येणारीं अशीं कांहीं छंदें आहेत. त्यांतून प्रसिद्ध तीं प्रसंगवशात् येथें सांगतों. तीं हीं–अभंग, दिंडी, साकी, ओवी आणि घनाक्षरी." असा मजकूर आहे. पृ. ३७.

२. सरस्वतीमंदिर, वर्ष ६, अं. ५. मार्गशीर्ष शके १८२८.

### ओवी

ओवी हा छंद अन्य कोणत्याही भाषेमध्यें आढळत नाहीं. मराठींतील जुन्यांतले जुने ग्रंथ याच वृत्तामध्यें छंदोबद्ध आहेत. म्हणून ओवीला आद्य मराठी छंद म्हणावयास हरकत नाहीं.

ज्ञानेश्वरांनीं गीतेवर भावार्थदीपिका ही टीका लिहितांना ज्याप्रमाणें संस्कृत भाषा सोडून जानपद बोलीचा आश्रय केला, त्याप्रमाणें पूर्णत्वापद पोंचलेलीं संस्कृत वृत्तें रहित करून त्यांनीं छंदही जानपदच योजलेला आहे. ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायामध्यें स्वतः ज्ञानेश्वरच म्हणतात,

' तो कृष्णार्जुन संवादु । नागरी बोलीं विशदु ।
सांगौनि दाऊं प्रबंधु । **वोवियेचा** ॥ ५५ ॥

दहाव्या अध्यायांत लिहितात,

'देशियेचे नागरपणें । शांत शृंगारातें जिणें, ।
**वोविया** होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥
आतां आपुलेनि प्रसादें । मियां भगवद्गीता **वोवी**-
प्रबंधें । पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥ ४३ ॥
"सकळ शास्त्रांचा विसंवता ठावो । ते भगवद्गीता
**वोवीं** गावो ॥ १९ ॥"

शेवटीं अठराव्या अध्यायांत त्यांनीं म्हटलें आहे,

तैसी गाणीवेतें मिरवी । गीतेवीणही रंगु दावी ।
तो लाभाचा बंधु **वोवी** । केला मियां ॥ १७४२ ।

तेणे आबालसुबोधें। **वोवियेचें** निबंधें।
ब्रह्मरस सुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ १७४३ ॥

एकनाथ म्हणतात,

हेतु, मातु, दृष्टांतु । न रिघे ज्यांचे शिंवे आंतू।
तो भागवतींचा भावार्थु। **ओवियां** तूं बोलविसी॥६॥
भागवत. अ. १६.

ज्ञानेश्वराच्याही पूर्वी होऊन गेलेल्या महानुभावीय लोकांच्या ग्रंथांमध्यें ओवीछंदाचा उल्लेख आहे. सुप्रसिद्ध शिशुपालवध या काव्याचा कर्ता भास्कर कवि यानें भागवताच्या एकादश स्कंधावर शके ११९६ सालीं जी मराठी ओवीबद्ध टीका लिहिली आहे, तिच्या आरंभींच तो म्हणतो,[3]

तया नागार्जुनाचा उपदेशु । भणऔवी बोलावेया शांतरसु ।
भास्कर कवि जाला सौरसु । ओ**वी** प्रबंधीं ॥६॥

दुसरा महानुभावीय ग्रंथकार दामोधरपंडित ( काल श. १२०० ) आपल्या **वच्छहरण** काव्याच्या आरंभींच लिहितो,[4]

नागार्जुनाचेनि प्रसादें । परम पुरुषाचेनि बोधें ।
श्रीकृष्णकथा ओ**वी** प्रबंधें । भणे मुनि केशव राजु॥६॥

मराठी भाषेच्या जन्मकालासंबंधीं विद्वान् लोकांची एकवाक्यता नाहीं. परंतु मराठी भाषेला ग्रांथिक स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी म्हणजे ती बोली स्थितींत असल्या वेळीं देखील ओवी छंद व त्याचें नांव महाराष्ट्रीयांमध्यें अस्तित्वांत असलें पाहिजे. कारण गायनाकडे मनुष्यप्राण्याची स्वाभाविक प्रवृत्ति असते. ग्रंथभाषेचा ज्यांना बिलकुल संसर्ग नाहीं, अशा निरक्षर व अत्यंत खेडवळ कुणबी बायकांमुलांमध्यें देखील ओवीवृत्त प्रचलित असलेलें दिसून येतें. मानसोल्लास ऊर्फ अभिलषित चिंतामणि या संस्कृत ग्रंथांत, " महाराष्ट्रेषु योषिद्भिरोवी गेया तु कंडने " ( महाराष्ट्रांत कांडतांना बाया ओव्या गातात ) असें म्हटलें आहे; त्यावरून ओवीप्रबंध ज्ञानेश्वरापूर्वी १६७ वर्षें तरी प्रचलित होता असें दिसतें.[5] कोंकणांत दळण्याच्या वेळीं ओव्या म्हणण्याची अशिक्षित कुणब्यांमध्यें चाल आहे. विशेषतः लग्नोत्सवाकरितां दळण दळतांना हें गाणें अवश्य मानलें जातें. लग्नोत्सवाच्या किंवा अन्य कोणत्याही प्रसंगीं ओव्या गाऊं नयेत, अशीं जुन्या काळीं पोर्तुगीज सरकारनें फर्मानें सोडलेलीं आढळतात.[6] यावरून ओवी छंदाचा व त्याच्या नामाचा जन्मकाल ग्रांथिक मराठीच्या जन्मकालापेक्षांही जुना असावा, असें वाटूं लागतें.

ओवी शब्दाची व्युत्पत्ति राजवाडे यांनीं आपल्या उपरिनिर्दिष्ट लेखांत दोन प्रकारें दिलेली आहे :--

१ ली.--शके १५६० मध्यें मुऱ्हारी मल्लबास नामेंकरून कोणी एका मानभाव ग्रंथकारानें रचलेल्या दर्शनप्रकाश नांवाच्या ग्रंथांत ओवी या अर्थी ओवणिका शब्द येतो. या ओवणिका शब्दापासून वोवी शब्द आला. उञ् = सूत्र ओवणें. ( आ × ऊयन = ओयन = ओयनिका = ओवणिका = ओवइआ = ओवीआ = वोवीया = वोवी )

२-री. वे = ओवणें, ग्रंथरचना करणें ( आ उति = ओति = ओइ = वोवी )

यापैकीं राजवाड्यांना पहिली व्युत्पत्ति पसंत आहे.

राजवाड्यांच्या या परिश्रमाचें व कल्पकतेचें मला सादर कौतुक वाटतें. तरी पण अशा प्रकारची ही व्युत्पत्ति केवळ द्राविडी प्राणायामाची होय, असा माझा समज आहे. कारण 'वोवणे' असा मराठीमध्यें शब्द आहे. त्यापासून सरळ वोवी शब्द अस्तित्वांत येणें स्वाभाविक दिसतें.[7] कोणतेही विचार किंवा शब्द गानसूत्रानें ज्यामध्यें

३. महानुभावीय मराठी वाङ्मय (देशपांडे) पृ. १९.
४. वच्छहरण (सं. वि. ल. भावे) श. १८४६ पृ.१.
५. विश्ववृत्त, जुलै १९०५ अंक पाहा.
६. Quadros Historicos I ( Miranda ) 1863, Pg. 155.
७. सुवर्णाचे मणि केले । ते सोनियाच्या सुतीं **वोविले** ।
तैसें म्यां जग धरिलें । सबाह्यांतरीं ॥ ३२ ॥
—ज्ञानेश्वरी अध्याय ७.

एकनाथ-कालीन ग्रंथकार त्र्यंवक आपल्या 'बालावबोध' नांवाच्या ग्रंथामध्यें म्हणतो,

हे केली **ग्रंथवोवणी** ।
परी जो **वोविला** शब्द मणी ।
तो नाहीं आला परतोनी ।
मालिके इयां ॥

—महाराष्ट्र-सारस्वत ( भावे ), आवृत्ति २ री, पृष्ठ १३४

ओवले आहेत ती वोवी, असा शब्द आस्तित्वांत येणें साहजिक आहे.

ओवीचें लक्षण ठरविण्याचा प्रयत्न अनेकांनीं केलेला आहे. श. १५०० च्या सुमारास होऊन गेलेल्या भीष्माचार्य नांवाच्या एका महानुभावीय ग्रंथकारानें आपल्या **मार्गप्रभाकर** नांवाच्या ग्रंथांत,

गायत्री छंदापासौनि धृतिपर्यंत !
ग्रंथ वोवियांचे तीन चरण जाणावे मिश्रित ।
प्रतिष्ठेपासोनि जगतीपर्यंत । चौथा चरण ॥ ४२७॥
( ज्ञानखंड )

असें ओवीचें लक्षण दिलें आहे. याचा अर्थ असा कीं, ओवीच्या पहिल्या चरणांत सहापासून अठरापर्यंत व चौथ्यांत चारपासून बारा अक्षरें असावीं. परंतु ज्ञानेश्वरीमध्यें पहिल्या तीन चरणांत पांच अक्षरें सांपडतात व चौथा चरण तीन अक्षरांचाही असतो. त्यामुळें ज्ञानेश्वरींतील अशा ओव्यांचा समावेश करण्याकरितां राजवाडयांना ओवीचें नवें लक्षण बांधावें लागलें ! वास्तविक ओवी हें कांहींसें वि-लक्षण व स्वैर वृत्त आहे. त्याचीं लक्षणें बांधण्याचा अलिकडचा प्रयत्न कै. रा. रा. भागवत यांनीं[८] व राजवाडे[९] यांनीं केलेला आहे. वैदिक छंदाप्रमाणें ओवीचें स्वरूप जरी विषम व आबडधोबड असलें तरी तें नीटनेटकें व सम कालांतरानें होईल, असा राजवाडयांचा आशावाद आहे. परंतु बंधापेक्षां निर्बंधाकडेच जो आजच्या जगाचा ओढा दिसून येतो, त्यावरून तो सफल होईलसें वाटत नाहीं. अत्यंत प्राचीन काळीं कोणत्याही जानपद गीताला ओवी म्हणत असत, असा माझा समज आहे. आज ज्याला आपण ओवी या नांवानें ओळखतों त्या छंदाचें साधारण लक्षण असें सांगितलें जातें कीं, "ओवीला चार चरण असतात, व पहिल्या तीन चरणाचे शेवटीं यमकें असतात. चौथा चरण पहिल्या तीन चरणांपेक्षां लहान असावा"[१०]. ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन यांच्या ओव्यांची धाटणी निरनिराळी आहे. ज्ञानेश्वराच्या ओवीचा चौथा चरण अर्धा किंवा तोकडा असतो. रामदासी ओवीचीही रचना साधारण अशीच. एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर यांचे चारही चरण साधारण सारखेच लांबीचे असतात. परंतु एकनाथी ओवीचा या सर्वांहीपेक्षां एक विशेष हा कीं, तिच्या चौथ्या चरणामध्यें कोठें तरी पहिल्या तीन चरणांतील अंत्ययमक असतें. पाहा :—

उद्योगेंवीण आहा**रू** । अयाचित सेवी अजग**रू** ।
डंडळोनि न सोडी धी**रू** । निधडा निर्धा**रू** पैं त्याचा ॥
स्वभावें तो सुख पस**री** । सहज पडे जें भीत**री** ।
सरस निरस विचार न क**री** । आहार अंगिका**री**
संतोषें[११] ॥

महीपतींनीं हीच एकनाथांची ओवीपद्धति स्वीकारलेली आहे. या सर्व ओवीप्रबंधकारांपैकीं वामनपंडिताची रचना जास्त अनिर्बंध व धांदरटपणाची दिसते. ओवीचा चौथा चरण ऊनाक्षरात्मक असावा, हें जें भागवतांनीं ओवीचें एक लक्षण सांगितलें आहे व राजवाडयांनीं एक अट मानली आहे, तिला तर कित्येक ठिकाणीं त्यांनीं धाब्यावर बसविलें आहे. पाहा:—

भगवंत म्हणा वेडा ।
अथवा त्या टीकेची श्रद्धा सोडा ।
गीता सोडोनि व्यर्थ पवाडा ।
गोष्टीचा वाचणे तरी वाचा गोड गोष्ट[१२] ॥ ६५४ ॥

महानुभावीय ग्रंथकारांपैकीं 'श्री ऋद्धिपुरवर्णना'चा कर्ता नारायण व्यास, 'शिशुपालवधा'चा कर्ता भास्कर कवीश्वर व्यास, वत्सहरणकर्ता दामोदर पंडित या जुन्या कवींच्या ओवीचा चौथा चरण ज्ञानेश्वरी ओवीसारखा तोकडा असतो. परंतु नंतरच्या शिवमुनि, शिवरामकिङ्कर वगैरे महानुभावीयांची ओवीची रचना मुक्तेश्वराच्या ओवीसारखी, म्हणजे पूर्ण चौथ्या चरणाची, असलेली दिसून येते. हल्लीं गद्य प्रबंधामुळें ओवीसारखा गद्यवजा छंद मागें पडल्यासारखाच झाला आहे. कुळकर्णी-लीलामृतासारख्या विडंबनात्मक विषयांखेरीज ओवीबद्ध रचना गंभीर विषयाकरितां फारशी कोणी करीत नाहीं, व केली तरी तिला मागणी आहे किंवा पुढें येईल, असें वाटत नाहीं.

---

८. वि. ज्ञा. विस्तार, फेब्रुआरी १८७४, पुस्तक ६, अं. ९, पृ. १७६.

९. सरस्वतीमंदिर, वर्ष. ६, अं. ५.

१०. वि. ज्ञा. विस्तार, वर्ष ६, अं. ९.

११. एकनाथी भागवत अ. ८, ओवी २५-२६.

१२. यथार्थदीपिका, अध्याय ९.

## अभंग

अभंग या नांवानें जें वृत्त आज आपण ओळखतों, त्याचे वारीकसारीक अनेक प्रकार सांगतां येतील. परंतु त्यांपैकीं ठळक दोनः—(१) चार-चरणी अभंग व (२) दोन-चरणी अभंग.

(१) भेटीलागीं जीवा लागलीसे आस ।
पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन ।
तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥

(२) हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं॥१॥
तोची मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥ २ ॥

चार-चरणी ओवी व चार-चरणी अभंग यांच्यामध्यें एक असा फरक सांगितला जातो कीं, ओवीचे पहिले तीन चरण यमकान्त असतात, तर अभंगाच्या दुसऱ्या व तिसऱ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें; परंतु पहिल्या तीन चरणांच्या शेवटीं यमक असलेले अभंग अनेक दाखवितां येतीलः—

तुकारामः—

शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार ।
शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥१॥
शरीर उत्तम चांगलें । शरीर दुःखाचें घोसुलें ।
शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥२॥

किंवा

देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरीवरी वाव ।
समर्पिला नाहीं जीव । जाणावा हा व्यभिचार ॥१॥

राजाई—

घरधन्यांनीं केला गुरु । बाई मी आतां काय करूं ।
असून नाहीं हा संसारू । चमत्कारू कृपेचा ॥१॥
धांव पाव गे मेसाई । कवणाचेंही न चले कांहीं ।
सत्यपण तुझिये ठायीं । असून नाहींसें करीं हें ॥२॥

वास्तविक तुकारामाच्या (पहिल्या) व राजाईच्या (नामदेवाची बायको) वरील अभंगाची रचना एकनाथाच्या ओवीसारखी आहे. निरनिराळ्या कवींची एखादी अशी कविता निराळी काढून, ही ओवी कीं अभंग हें सांग, असें एखाद्यास विचारल्यास त्याचा गोंधळ उडेल इतकें ओवी व अभंग यांमध्यें निकट साम्य किंवा अभिन्नत्व आहे. अलीकडच्या वृत्तदर्पणामध्यें (आवृत्ति १९ वी, इ. स. १९२५) असें म्हटलें आहे कीं, "मोठ्या अभंगाचा दुसरा प्रकार व ओवी हीं सारखींच होत. मोरोपंती सीतागीत वगैरे गीतें व मोठ्या अभंगाचा पहिला प्रकार हीं सारखींच होत. यावरून ओवी व अभंग यांचा अन्योन्यसंबंध जवळचा आहे, हें दिसून येईल."

वस्तुतः अभंग हाही एक ओवीचाच प्रकार आहे. गानसुलभ म्हणून विशेष ठाकठीक अशी जी ओवी तो अभंग असें म्हणावयास हरकत नाहीं. म्हणूनच अभंगाचें स्वरूप कांहींसें स्फुट व भावपूर्ण (lyrical) असतें. ओवी निवेदनात्मक (narrative) व टीकात्मक अशा प्रबंधाकरितां योजिली जाते.

"ज्या छंदांत भंग नाहींत तो अभंग. भंग म्हणजे कर्णमधुर गण. अर्थात् अभंग म्हणजे गणविहीन वृत्तात्मक समचरण किंवा विषम चरण छंद." अशी अभंगाची व्याख्या व व्युत्पत्ति राजवाड्यांनीं दिलेली आहे.[13] परंतु हें लक्षण यथार्थ मानलें, तर तें ओवीलाही तितकेंच लावतां येईल. येथें प्रश्न हा कीं, ओवीला अभंगाचा फांटा कसा फुटला? ओवी हा शब्द वृत्त या अर्थीं फार जुन्या ग्रंथामध्यें सांपडतो, हें वर दाखविलेंच आहे. ओवीप्रमाणें अभंग शब्दही किती मागें सांपडतो, हें पाहणें मनोरंजक होईल. ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, रामदास यांनीं ओवीप्रमाणें ज्याला आपण आज अभंग म्हणतों त्या वृत्तामध्येंही रचना केलेली आहे. परंतु अभंग हा शब्द वृत्त या अर्थीं निश्चितपणें जें क्षेपक नाहीं असें म्हणतां येईल, अशा इ. स. अठराव्या शतकाच्या पूर्वील वाङ्मयांत मला आढळलेला नाहीं. अभंग हा शब्द ज्ञानेश्वरीमध्यें पांचसहा ठिकाणीं आलेला आहे, परंतु तो अविनाशी या अर्थी.

ज्ञानेश्वराच्या अभंगामध्येंही वृत्तार्थी अभंग शब्द[14] नाहीं.

ज्ञानदेव **गीत** सांगतसे नित्य ।
कृष्ण कृष्ण सत्य इतुकें सार ॥

(अ. ७५०) अशा प्रकारें आपल्या कवनाला तो गीतच म्हणतो. श्रीनिवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई

१३. सरस्वतीमंदिर, वर्ष ६, अं. ५.

१४. ज्ञानदेवाचा गाथा (रा. श्री. गोंधळेकर) आ. ३री शके १८२२ पाहा.

व चांगदेव यांच्याही अभंगामध्यें अभंगछंदाचा नामनिर्देश नाहीं.

नामदेवाच्या अभंगांमध्यें मात्र दोनचार ठिकाणीं वृत्तार्थी अभंग शब्द आढळतो. परंतु अस्सल अभंगामध्यें जी क्षेपक अभंगांची बेसुमार भेसळ झाली आहे, तीमुळें ते अभंग नामदेवाच्याच हातचे आहेत, कीं कै. भावे यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे पुढील 'वाचाटांनीं' नामदेवाच्या काव्यामध्यें घुसडलेले आहेत, याचा विचार झाला पाहिजे. वाचकांना स्वतःच विचार करतां यावा म्हणून तीं स्थळें देतों.

चंद्रभागेतीरीं आयकली गोष्टी ।
वाल्मिकें शतकोटी ग्रंथ केला ॥१॥
माझिया चित्तासी फार झाले क्लेश।
वृथा मी आयुष्य गमाविलें ॥२॥
जाऊनी सकळा विठोसी विनविलें।
वाल्मिकानें केलें रामायण ॥३॥
असेन मी खरा तुझा भक्त देवा ।
सिद्धीस हा न्यावा पण माझा ॥४॥
शतकोटी तुझे करीन अभंग ।
म्हणे पांडुरंग ऐक नाम्या ॥५॥
तयेवेळीं होती आयुष्याची वृद्धि ।
आतांची अवधी थोडी असे ॥६॥
नामा म्हणे जरी न होता संपूर्ण ।
जिव्हा उतरीन तुजपुढें[15] ॥७॥

---

निश्चय पाहुनि उपजली दया ।
स्वामी देवराया पांडुरंगा ॥१॥
सारजेसी सांगे भीमातीरीं हरि ।
बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥२॥
लाडकें लडिवाळ नामा माझें तान्हें ।
तयाला मजविणे कोण आहे ॥३॥
मजवरी त्याचें फार असे ऋण ।
होइन उत्तीर्ण एवढ्यानें ॥४॥
नामा म्हणे हातीं बांधोनिया वह्या ।
बैसे लिहावया पांडुरंग ॥५॥

वरील दोनही अभंग गोंधळेकरांनीं प्रसिद्ध केलेल्या नामदेवाच्या गाथेंत मला आढळले नाहींत. शिवाय भाविक बुद्धीनें महीपतीसारख्या पुढील ग्रंथकारांनीं जरी अशी अतिशयोक्तिपूर्ण कथा लिहिली, तरी नवल मानावयाचें कारण नाहीं. परंतु अशा पणाची अशक्यता व आपल्यापुढें असलेली नामदेवाची अभंगसंख्या पाहिली म्हणजे नामदेव स्वतःसंबंधीं असें लिहील अशी कल्पना करणें म्हणजे त्याच्यावर सोंगढोंगाचा व थापेबाजीचा आळ घालणें होय, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. शिवाय या अभंगाच्या पूर्वीं तुकारामाचे जे दोन अभंग दिले आहेत, त्यांपैकीं दोनही जोगांच्या व तुकारामतात्यांच्या तुकारामाच्या गाथेच्या आवृत्तीमध्यें नाहींत. पहिला मात्र आर्यभूषण व निर्णयसागर प्रतीमध्यें सांपडतो. ते नामदेवाच्या गाथेंतील दोन अभंग हेः—

१

नामयासी[16] केलें स्वप्नामध्यें जागें ।
स्वयें पांडुरंगें येवोनिया ॥ १ ॥
सांगितलें कानीं करावें कवित्व ।
वाऊगें अनुचित बोलों नये ॥ २ ॥
माय टाकी सळे धरिलें विठ्ठलें ।
थापटोनी केलें सावधान ॥ ३ ॥
प्रमाणाची संख्या केली[17] शतकोटी ।
उरले शेवटीं लावी तुका ॥ ४ ॥

---

नामयानें संकल्प केला शतकोटी।
पूर्णता शेवटीं कैसी आली ॥ १ ॥
साठी लक्ष आणि चौऱ्याण्णव कोटी ।
ललित शेवटीं नव लक्ष ॥२ ॥
माता पिता कांता भगिनी कुमारी गोमटी ।
**अभंग** नव कोटी वदले वाचे ॥ ३ ॥
येथोनिया जाहला सरस्वतीचा लेख ।
पुढें गजमुख सादर जाहला ॥ ४ ॥
सत्राची कविता आलीसे मेळणीं ।
प्रेमरस वाणी प्रेमळची ॥ ५ ॥
चौघेजण पुत्र चौघी त्याच्या सुना ।

---

१५. श्रीनामदेवाची गाथा ( तुकारामतात्या ) इ. स. १८९४, अभंग ७८७ व ७८८.

१६. आर्यभूषणादि तुका. गाथेंतील पाठभेद 'नामदेवें'
१७. ,, ,, ,, ,, 'सांगे'

कोटी सत्रा जाणा वदला वाचे ॥ ६ ॥
एक कोटी अभंग श्रीमुखाची साक्ष ।
पन्नास ते लक्ष रुक्मिणीचे ॥ ७ ॥
येथोनिया जाहला गजवदनाचा लेख ।
बाकी राहिली देख पंचविसाची ॥ ८ ॥
जनीचे अभंग साडेबारा कोटी ।
प्रेमरस मिठी प्रेमाचिये ॥ ९ ॥
चौपन्न हे कोटी एकोणहत्तर लक्ष ।
कवित्व हें साक्ष नामयाचें ॥ १० ॥
अनंतभटें केला असे लेख ।
श्रीमुख देख नारायण ॥ ११ ॥
तुका म्हणे ऐसी निवड केली निर्का ।
राहिली ती बाकी शेष पुढें ॥ १२ ॥

हा दुसरा अभंग तर कोणत्याही इतर गाथेमध्यें मला आढळत नाहीं. महिपतीच्या आगेमागें कोणी तरी तो रचलेला दिसतो.

याशिवाय तुकारामतात्यांच्या प्रतींत नामदेवाचे म्हणून आणखी दोन अभंग आहेत, ते अभंग रचनेच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. मात्र ते अस्सल म्हणावयास इतरत्र अभंग शब्द सांपडणें जरूर आहे. ते हे:–

अभंगाची कळा कांहींच मी नेणत ।
त्वरा केली प्रीत केशवराजें ॥ १ ॥
अक्षरांची संख्या बोलिलों उदंड ।
मेरू तो प्रचंड शर आधीं ॥ २ ॥
साहा साडेतीन चरण जाणावे ।
अक्षरें मोजावे चौक चारी ॥ ३ ॥
पहिलेपासोनिया तिसरेपर्यंत ।
आठवा गणीत मेज आली ॥ ४ ॥
चौक चार आधीं बोलिलों मातृका ।
साविसाची संख्या शेवटील ॥ ५ ॥
दीड चरणांची दीर्घ तें अक्षरें ।
सूक्ष्म विचारें बोध केलें ॥ ६ ॥
नामा म्हणे एक शून्य केलें हरि ।
प्रांतीनें खेचरीं आज्ञा केली[१८] ॥७ ॥

मुख्य मातृकांची संख्या सोळा अक्षरें नेटक्या । १ ।
समचरणी अभंग नव्हे ताळ छंदोभंग ॥ २ ॥
चौक पुलिता विसर्ग गण यति लघुदीर्घ । ३ ।
जाणे एकादा निराळा नामा म्हणे तो निराळा[१९] ॥४॥

यांपैकीं दुसरा गोंधळेकर प्रतींत मला सांपडला नाहीं. मेरु, शर वगैरे छंदःशास्त्रांतील कठीण पारिभाषिक शब्दांवरून या अभंगाच्या अस्सलपणाबद्दल जास्त शंका वाटते. तुकारामतात्यांच्या गाथेंत आणखी दोन अभंग असून त्यांत एकांत (अ. नं. २७३९) कोणी कोणाचे श्लोक लिहिले तें व दुसऱ्यांत ( अ. नं. १७९९ ) 'जनीचे अभंग लिहित नारायण' असें सांगितलें आहे, ते कथात्मक असून केवळ शेवटीं नामदेवाचें नांव आलें म्हणून या गाथेंत अन्तर्भूत केलेले दिसतात.

एकनाथाच्या भागवतांत व अभंगांतहीं[२०] इतर अर्थी अभंग शब्द आला तरी वृत्तार्थी अभंग शब्द नाहीं.

फादर स्टिफन्सच्या सुप्रसिद्ध ख्रिस्तपुराण या मराठी काव्यामध्यें ( समाप्तिकाल इ. स. १६१४ ) अभंग शब्द वृत्तार्थी आलेला आहे, अशी पुष्कळांची समजूत आहे. या पुराणाचे संपादक मि. साल्डाना आपल्या प्रस्तावनेंत लिहितात,[२१]

"The metre employed by the author is, correctly speaking, the *ovi* metre rendered famous by such poets as Dnyandeo, Mukteshwar and Eknath. But as the author himself *more than once* refers to it as *abhang* metre, it may be useful to define both."

( येथे ओवी व अभंग यांतील भेदाची प्रो. राजारामशास्त्री भागवतांकडून मिळालेली माहिती देऊन मि. साल्डाना लिहितात— )

"The first of these classes of *abhangas* is said to be "almost indistinguishable from the *ovis* of Eknath and others, subsequent to him, the only distinction between them being in tone or mode of reading rather than in anything else."

१८. तुकारामतात्या, पृ. ३१३; गोंधळेकर, पृ. १७९.

१९. तुकारामतात्या, पृ. ६८८.

२०. तुकारामतात्या, इ. स. १९०३.

२१. The Christian Puranna. 1907, Introduction Pg. LXIV,

पुढें स्टिफन्सनें योजलेला छंद ओवीच असल्याबद्दल डॉ. कीर्तिकरांचें मत तळटीपेंत देऊन ते म्हणतात,–

" Fr. Stephen's work, as said above, has been written rather in the *ovi* than in *abhang* metre and that the latter name must therefore have been *somewhat loosely employed* by the author "

बऱ्याच विद्वान् लोकांनीं या पुराणांतील अभंग शब्दाच्या गूढाचा भंग करण्याबद्दल प्रयत्न केलेला दिसतो. परंतु त्यांनीं साप साप म्हणून दोरी वडविली आहे, अशी मला शंका येते. वस्तुतः ख्रिस्त पुराणामध्यें आलेले **अभंग** शब्द वृत्तार्थी नसावे. स्टिफन्स आपल्या मराठी प्रस्तावनेंत म्हणतो,[२२]

"म्हणवुनु ख्रिस्तांव तुमीं उदण्ड करुनु परमेश्वरासी अर्थें या आणि उपेगु माना, कां तुमासी यमकोंडीच्या मार्गाचें वा· अनुभावार्थियांच्या अंधःकारांतुले काडुनु किस्तांवपणाभीतुरी मेळसें केलें. तेयाच्या उत्तम शास्त्राचा उजवाडु भोगुंसी **आमी जें कार्य करूंसीं आधारिलें** तें परमेश्वराचे क्रुपेस्तव आमचे अल्प-शक्ती सांगडें सिद्धी पावलें. **दों पुराणाचे अभंग केले**. तेयामाजी उत्तरांची चुकी जाहालेयावरी ती तुमी क्षमा करा." माझ्या मतें वर "दों पुराणाचे अभंग केलें" असें मूळ असावयास पाहिजे. म्हणजे 'दों पुराणाचें ( जें कार्य करूंसी आधारीलें तें ) अभंग ( permanent ) केलें.' लेखनप्रमादामुळें अनुस्वार गाळले गेले असावे. त्यांमुळें हा गैरसमज झाला असणें शक्य आहे. रोमन लिपीमध्यें हें पुराण लिहिलें असून अनुस्वार n या अक्षरानें दाखविला जातो, हें खरें. परंतु अशी चूक अन्यत्रही काव्यांत आढळते : दिण्डीचे बद्दल diddiche असें लिहिलें आहे. ( पुराण २ रें, अवसरू ४४, ओंवी २१८ पाहा ) झेवियर कॉलेजचे फादर हेरास यांच्याजवळ असलेल्या या पुराणाच्या दोन जुन्या हस्तलिखित प्रती मीं पाहिल्या. परंतु त्यामध्यें प्रस्तावना नसल्यामुळें जास्त शोध करतां आला नाहीं. अभंगु शब्द आलेलें दुसरें जें एक स्थळ आहे, तेंही वृत्तार्थीच आहे, असें मि. साल्डानाप्रभृति समजतात. तें पाहिलें असतां ही दिशाभूल दिसून येईल. ख्रिस्तपुराणाच्या अगदीं शेवटीं खालील ओंव्या आहेत.[२३]

इतुक्याचें ससार वेंचुनु
काढिली टीका गांथुनु
भाषा मराठी मिसळुनु
केला ग्रंथु ॥ ११८ ॥
जेजु स्वामी भक्तांचा कैवारी
जडीं जन्म घेतला संसारीं
वरुषें सोळा शतें चतुर्दश वेरी
तैं लागोनि जाहलीं ॥ ११९ ॥
तो सांगु (Sanqhu) चालते वरुषीं
वसंतकाळीं वैशाख मासीं
देवग्रंथु मराठियेसी
**अभंगु** केला ॥ १२० ॥

येथें अभंगु शब्दाचा अर्थ काय हें उघड कळण्यासारखें आहे. प्रो. तुळपुळे आपल्या ख्रिस्तपुराणावरील लेखमालेंत हा अभंग शब्द वृत्तार्थीच मानतात.[२४]

तुकारामाच्या गाथेंत[२५] देखील अभंग वृत्ताचा उल्लेख नाहीं, ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. जेथें जेथें तो वृत्तार्थी निर्देश करतो तेथें तेथें ओव्या म्हणतो. पाहा:—

आलें तें आधीं । खाईन भातुकें ।
मग कवतुकें । गाईन **ओव्या** ॥
राम वेळोवेळीं आम्हीं गाऊं **ओवीये** ।
पहिली माझी **ओवी** । ओवीन जगत्र ।
गाइन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥
........................
दाहावी माझी **ओवी** । दाहा अवतारा ।
न यावें संसारा । तुका म्हणे ॥ १० ॥
गाईन **ओविया** । पंढरीचा देव ।
आमुचा तो जीव । पांडुरंग ॥ १ ॥
आतां गाऊं तुज **ओवी** अमंगळीं ।
करूं गदारोळीं हरिकथा ॥
गाईन **ओविया** शिष्टांच्या आधारें ।
सारीन विचारें आयुष्या या ॥

---

२२. The Christian Puranna., Introduction Pg. XCIV.

२३. The Christian Puranna ( 1907 ) Pg. 524.

२४. रत्नाकर, वर्ष ३, अं. ६.

२५. मजपुढें आर्यभूषण प्रेस ( १९१३ ) ची सांप्रदायिक गाथा आहे.

नामदेवाच्या गाथेंत असलेला तुकोबाच्या नांवावरील अभंग (ज्यांत वृत्तार्थी अभंग शब्द आहे ) क्षेपक आहे हें वर सांगितलेंच. याशिवाय इंदुप्रकाशच्या तुकारामाच्या गाथेच्या[२६] प्रस्तावनेंत

वेदाचे अभंग केले श्रुतिपर ।
द्वादश सहस्र संहितेचे ॥
.......................
चौतिस सहस्र लक्ष कोटी पांच ।
सांगोनिया साच तुका गेला ॥

असा एक अभंग असल्याबद्दलचा देऊन तो प्रक्षिप्त असल्याबद्दल विद्वान संपादकद्वयांनींच नमूद केलें आहे.

रामदासही, ज्यांना आज आम्हीं अभंग म्हणतों त्यांत, पुढीलप्रमाणें उद्गार काढतो[२७]:--

**ओवीचें** आरंभीं वंदू विनायक ।
बुद्धिदाता एक लोकांमध्यें ॥
**वोवीचेनि** मिसें । देव आठवावा ।
हृदयीं धरावा । सर्वकाळ ॥

———

**वोवीचेनि** मिसें । स्वरुपासि जावें
सत्वर पावावें । समाधान ॥
बुझसील साच धरितां विश्वास ।
**ओवी** रामदास सांगतसे ॥

———

नमन योगिया स्वामी दत्तात्रया ।
गाईन **ओविया** संसारीच्या ॥

एखादें वृत्त कवीचें आवडतें असलें, म्हणजे त्या छंदांतच तो पुष्कळशी कविता करतो, व त्याचा नामनिर्देश त्याच्या कवितेंत येणें अपरिहार्य असतें. ज्ञानेश्वरादि कवींनीं ओवीप्रबंधाचा उल्लेख ठिकठिकाणीं केलेला आहे. मोरोपंतांनींही[२८],

आर्या आर्यांसि रुचे, ईच्या ठायीं जशी असे गोडी।
नांदे इतरां छंदीं गोडी, तरि यापरीस ती थोडी ॥

असे आपल्या आवडत्या आर्याछंदाचे उल्लेख केलेले आहेत. तसा अभंग-छंदाचा नामनिर्देश, ज्ञानदेव, एकनाथ, व विशेषतः तुकाराम यांच्या काव्यांत आढळूं नये, याचें नवल वाटतें. आणि त्यामुळेंच नामदेवाचे अभंगरचनेसंबंधीं उपरिनिर्दिष्ट दोन अभंग आहेत, तेही प्रक्षिप्त असावेसे वाटतात. वास्तविक यमकाच्या दृष्टीनें अभंग हा शब्द त्यांच्या कवितेंत पुनःपुनः यावयास पाहिजे. कारण ह्या सर्व कवींचें आराध्य दैवत पांडुरंग हा आहे, आणि त्या पांडुरंगाच्या यमकाला जुळण्याकरितां अभंग शब्द सोईचा आहे. शिवाय तो सहज वापरतां येण्यासारखाही होता. तसा अभंग शब्द अनेक ठिकाणीं आलाही आहे. परंतु तो वृत्तार्थी नव्हे. रंग, संग, अव्यंग अशांसारखे शब्द अभंगांत फार येतात. एकनाथाच्या कवितेंत अनंगही आला; मग अभंग शब्द वृत्तार्थी रूढ असता तर त्याचा ह्या कवींनीं कां उपयोग करूं नये?

रामदास-तुकारामांनंतर अभंग शब्द छंद या अर्थी काव्यांमध्यें आढळतो. उदाहरणार्थ दासविश्रामधाम ग्रंथामध्यें अभंग शब्द आलेला आहे.[२९]

देखोनि तयाची वचनकुयुक्ति ।
समर्थांनीं हरुषले चित्तीं ।
**अभंग** लिहोनि धाडिले त्याप्रती ।
श्रोतीं सादर ऐकावें. ॥

महीपतीच्या ग्रंथांतही अभंग शब्द वृत्तार्थी आढळतो;[३०] परंतु तुकारामाच्या बालक्रीडेच्या अभंगांना त्यानें भक्तलीलामृतामध्यें ओव्याच म्हटलें आहे; पाहाः–[३१]

ते बालक्रीडा तुकयानें आपुले मती ।
प्रथमारंभीं लिहिली ग्रंथीं ।
नउशें **ओव्या** त्याच्या असती ।
स्वानुभवें जाणती संतसाधु ॥५१॥

या कवितांसंबंधीं रा. पांगारकर म्हणतात, "सर्व ग्रंथांतून ह्या ओव्या बालक्रीडेचे अभंग या सदराखालीं छापल्या आहेत. त्यांना ओव्याही म्हणतां येईल. व अभंगही म्हणतां येईल.[३२]" असो.

२६. आवृत्ति इ. स. १८६९.
२७. श्रीरामदासाचे समग्रग्रंथ (चित्रशाळा प्रेस) पाहा.
२८. मोरोपंती स्फुट आर्या पाहा.
२९. दासविश्रामधाम, खं. २रा, पृ. ३६८.
३०. भक्तविजय, अध्याय ५२ पहा.
३१. भक्तलीलामृत, अध्याय ३२ पाहा.
३२. तुकारामाचें चरित्र (पांगारकार) पृ. ४२.

थेट ज्ञानेश्वरापासून जरी निरनिराळ्या कवींनीं अभंग लिहिले असले, तरी पण अभंगछंदाला महत्त्व तुकारामामुळें प्राप्त झालें आहे, हें विसरतां कामा नये. अर्थात् तुकारामाच्या चरित्राशीं या छंदाचा संबंध असावा, असें साहजिकच वाटूं लागतें. तुकारामाच्या कविता, त्याचें महत्त्व सहन न होऊन कांहीं दुष्टांनीं बुडविल्या; परंतु त्या **अभंग** राहिल्या अशी हकीकत महीपतींनीं दिली आहे:--[33]

ऐसी प्रतिष्ठा वाढतां जनीं। दुरात्मे संतप्त झाले मनीं। म्हणती शास्त्रमार्ग टाकोनि। पाखंड वाणी बोलतसे ॥ २५६ ॥। तुकयानें केलें जें कवित। त्या वह्या बांधोनि वस्त्रांत। उदकांत बुडवाव्या त्वरित। विचार निश्चित दृढ केला ॥ २५८ ॥ तैशापरी ते दुर्जन... प्रवेशले तुकयाचें सदन। म्हणती तुवां पाखंड रचून। लाविले जन भक्तीसी ॥ ६२ ॥ हे तुझी प्राकृत वाणी। सर्वथा ऐकूं नये श्रवणीं। ऐसें म्हणोनि त्या दुर्जनीं। पुस्तकें हिरोनि घेतलीं ॥६३॥ मोटा बांधोनि सत्वरी। पाषाण घातले त्या भीतरी। नेउनी इंद्रायणीचे तोरीं। उदकामाझारी बुडविल्या ॥६४॥ ब्राह्मण म्हणती तुकयालागून। तेरा दिवसांचा घातला पण। जरी कोरडे काढील जगज्जीवन। तरी मानूं प्रमाण यथार्थ ।६५॥ तेवीं वह्या बुडवितां दुर्जनीं। तुकयाचें विक्षेप पावलें मन। +++ मग देवळांत येऊनि ते अवसरीं। धरणें घेतलें महाद्वारीं।...ऐसे तेरा दिवस लोटतां जाण। पुस्तकें पाहाती विचक्षण। तो अक्षरांमाजी जीवन। आतळलें नाहीं सर्वथा। २९३ ॥ कोरडे कागद निघाले जाण। आतां पाहे दृष्टि उघडून। ऐसें म्हणोनि सकळ जन। करिती नमन साष्टांगीं ॥ २९४ ॥[34]

महीपतीनें लिहिलेला हा चमत्कार केवळ भाविक समजूत आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण स्वतः तुकारामबुवांच्या अभंगांमध्येंच त्याला आधार आहे. तुकारामाचे पुढील आत्मचरित्रपर अभंग पाहा:—

नामदेवें केलें। स्वप्नामाजी जागें।
सवें पांडुरंगें। येवोनिया ॥ १ ॥
सांगितलें काम। करावें कवित्व।
वाउगें निमित्त। बोलों नये ॥ २ ॥ ७५३

———

मानियेला स्वप्नीं। गुरूचा उपदेश
धरिला विश्वास। दृढ नामीं॥१॥
यावरी या जाली। कवित्वाची स्फूर्ती।
पाय धरिले चित्तीं। विठोबाचे ॥ २ ॥
निषेधाचा कांहीं। पडला आघात।
तेणें मध्यें चित्त। दुखवलें ॥ ३ ॥
बुडविल्या वह्या। बैसलों धरणें।
केलें नारायणें। समाधान ॥४॥ ७६७
थोर अन्याय केला। तुझा अंत म्या पाहिला ॥
जनाचिया बोला-। साठीं चित्त क्षोभविलें ॥१॥
भोगविलासीं केला सीण। अधम मी यातीहीन
झांकुनी लोचन। तेरा दिवस राहिलों ॥ २ ॥
अवघे घालोनिया कोडें। तहान भूकेचें सांकडें।
योगक्षेम पुढें। तुज करणें लागलें ॥ ३ ॥
उदकीं राखिले कागद। चुकविला जनवाद।
तुका म्हणे ब्रीद। साच केलें आपुलें ॥ ४ ॥
३५३३

तुकारामपूर्व वाङ्मयांत अभंग शब्द वृत्तार्थी नाहीं ही गोष्ट एकदा निश्चित ठरली, तर **अभंग** या छंदोनामाचा उगम या तुकारामाच्या चरित्रांतील प्रसंगाशीं आहे, असें निश्चित अनुमान करतां येईल. तुकारामामुळें ओवीचा गानीय व स्फुट असा जो हा प्रकार अभंग नामें आतां जास्त प्रख्यातीला आला आणि तशासारखें तुकारामपूर्वील कवींचें जें जुनें स्फुट

---

३३. भक्तविजय, अध्याय ५२ पाहा.

३४. "तेराव्या दिवशीं तुकारामबोवांच्या पोथ्या पाण्यावर आपोआप तरंगतांना दिसल्या व त्या कोणी बाहेर काढल्या, अशी दंतकथा आहे. परंतु ती भाकडकथा दिसते. तुकारामबुवांनीं फार बंदोबस्तानें आपल्या पोथ्या बांधून व वरखालीं धोंड्याच्या चिपा लावून नदींत टाकल्या होत्या. त्या पाण्यांत बुडाल्या, पण वेष्टनामुळें भिजल्या नाहींत व धोंड्याच्या वजनामुळें वाहूनही गेल्या नाहींत, असा, खरा प्रकार होता. याला आधार गाथेचा आहे."—बा. अ. भिडे. ( तुकारामबुवा श. १८३० ) पृष्ठ ५९ टीप.

काव्य त्यालाही पुढील नक्कलकारांनीं अभंग असें नांव दिलें, असें होणें संभवनीय आहे. तुकारामाच्या किंवा त्याच्या पूर्वीच्या कवींच्या निश्चितपणें अस्सल म्हणतां येईल अशा काव्यांमध्यें अभंग शब्द वृत्तार्थी जरी मला आढळला नाहीं असें जरी मीं वर म्हटलें असलें, तरी पण प्रत्येक महाराष्ट्र कवीची ओळन् ओळ मीं वाचली आहे किंवा वाचलेल्यामध्यें माझ्या दृष्टींतून हा शब्द चुकभुलीनें सुटला नाहीं, असें जोंपर्यंत मला छातीठोक म्हणतां येत नाहीं, तोंपर्यंत यासंबंधीं अखेरचा निर्णय देणें इतर संशोधक व जिज्ञासु वाचकांवर सोंपविलेलें बरें. मात्र जर असा शब्द सांपडला तर ती कविता प्रक्षिप्त नाहीं, याबद्दल आधीं खात्री करून घ्यावी म्हणजे झालें. तुकारामाच्या पूर्वी अभंग शब्द वृत्तार्थी होता, असें खात्रीपूर्वक ठरलें तर त्याचा उगम कशांत आहे व त्याची व्युत्पत्ति काय, याचा उलगडा होणें अवश्य आहे. असो.

"तैसी गाणीवेतें मिरवी ।' 'गीतेवीणही रंग दावी" असें ज्ञानेश्वरांनीं ओवीसंबंधीं म्हटल्याचें वर सांगितलेंच आहे. ओवी "गाणीवेतें मिरवूं" लागली म्हणजे तो अभंग व "गीतेवीणही रंग" दावूं लागली म्हणजे ती ओवी, असा ओवी व अभंग यांमधील सध्याचा ठळक भेद आतां सांगतां येईल.

दिन्डी ज्याला मी दण्डी म्हणतों त्याचा विचार पुढच्या लेखांकांत करीन.

---

# पुस्तकपरीक्षण

## "दत्तकनिर्णयामृतम्"

[ लेखकः—रा. रा. **केशवाचार्य गजेंद्रगडकर**, बी. ए., (ऑनर्स) एलएल. बी. ]

संस्कृत हीं मृत भाषा आहे असें म्हणण्याचा प्रघात अलीकडे पडला आहे. याचा अर्थ ही भाषा सांप्रत काळीं कोठेंही बोलण्याच्या प्रचारांत नाहीं व या भाषेमध्यें नवीन ग्रंथनिष्पत्ति होत नाहीं. हा आक्षेप खोटा ठरविण्याचे प्रयत्न संस्कृत भाषाभिमानी लोकांकडून केले जातात. पुणें मुक्कामीं संस्कृतामधून वक्तृत्व करण्याकरितां स्थापन झालेली सभा हा त्या दृष्टीनेंच एक प्रयत्न होय. वर निर्दिष्ट केलेलें पुस्तक हें त्याच प्रयत्नाचें फळ होय असें म्हणावयास हरकत नाहीं.

**'दत्तकनिर्णयामृतम्'** हें पुस्तक संस्कृतामध्यें नाशिक येथील काव्यतीर्थ श्रीधरशास्त्री वारे यांनीं लिहिलें आहे. प्रायः शास्त्री लोक म्हणजे ग्रंथांतील पंक्तीचा अर्थ लावण्यांत कुशल असतात, प्राच्य पदवीनें भूषित झालेल्या लोकांप्रमाणें त्यांना अभ्यासाची चिकित्सक पद्धति माहित नसते, असा आक्षेप जुन्या शास्त्रीलोकांविरुद्ध नेहमीं आणिला जातो. अशा आक्षेपास प्रस्तुतसारखें संस्कृत भाषेमध्यें लिहिलेलें सुंदर पुस्तक हें फार परिणामकारक उत्तर होय, यांत शंका नाहीं.

या ग्रंथामध्यें ग्रंथकारानें वेद, जैमिनीसूत्रासारखे सूत्र ग्रंथ, मनु, याज्ञवल्क्य वगैरे स्मृतिग्रंथ, दत्तकचंद्रिका, प्रवरमंजरी वगैरेसारखे प्रकरणग्रंथ अशा एकंदर ५२ ग्रंथांचा निर्देश केला आहे, व या सर्व ग्रंथांतील दत्तकासंबंधीं विचारांचें साकल्यानें विवरण करून आपले स्वतःचे सिद्धांत ग्रंथकारानें या पुस्तकांत मांडले आहेत. यावरून ग्रंथकाराच्या धर्मशास्त्रविषयक ग्रंथांच्या अभ्यासाची प्रचीति ग्रंथामध्यें ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते. कांहीं सिद्धान्त पूर्व ग्रंथकारांच्या मतांविरुद्ध मांडण्याचें धैर्यही ग्रंथकारानें दाखविलें आहे व हें दाखवितांना ग्रंथकारानें स्वतंत्र चिकित्सक दृष्टिही प्रगट केली आहे. हा गुण सर्व शास्त्री म्हणविणाऱ्या परंपरागत वचनांवर अंधदृष्टीनें विश्वास ठेवणाऱ्या सनातनी लोकांना अनुकरणीय आहे असें आमचें ठाम मत आहे.

या छोटया ग्रंथाचीं ८३ पृष्ठें असून त्याचे मुख्यतः दोन भाग पाडतां येतील. पहिला भाग ७१ पानांपर्यंतचा ग्रंथ हा होईल, व पुढील १२ पृष्ठें हा ग्रंथाचा दुसरा भाग म्हणतां येईल. पहिल्या ७१

पृष्ठांत ग्रंथकारानें शास्त्रीय दृष्ट्या दत्तकाच्या प्रश्नासंबंधीं विचार केला असून पुढील भागांत दत्तकविधानाचा याज्ञिक प्रयोग दिला आहे. याप्रमाणें स्थूलमानानें ग्रंथाचें स्वरूप आहे.

ग्रंथास महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यांनीं संस्कृत भाषेंतच प्रस्तावना लिहिली आहे, व वर्णाश्रम-स्वराज्य-संघाचे अध्वर्यु राजेश्वरशास्त्री द्रवीड व श्री. वामनशास्त्री किंजवडेकर यांनीं ग्रंथाबद्दल अभिप्राय प्रगट केले आहेत. प्रस्तावनाकार व अभिप्राय देणारे विद्वान् शास्त्रीमहाशय यांना ग्रंथामध्यें प्रकट केलेलीं सर्वच मतें मान्य आहेत कीं नाहींत, हें कळण्यास ग्रंथांत साधन नाहीं. शेवटीं हा ग्रंथ हैदराबादचे प्रसिद्ध दानशूर राजा धनराजगिरजी यांच्या दातृत्वामुळें प्रकाशित करितां आला, म्हणून त्यांचा फोटोही ग्रंथांत छापिला आहे, व हा ग्रंथ ग्रंथकारानें आपले तीर्थरूप वैदिकतिलक अण्णाशास्त्री वारे यांना अर्पण केला आहे व त्यांचीही प्रतिकृति ग्रंथांत दिली आहे. याप्रमाणें या ग्रंथाचें स्थूलमानानें स्वरूप आहे.

हिंदु-कायदा-सुधारणेची आस्था असणाऱ्या लोकांस हे पुस्तक अत्यंत उपयोगी होईल. यामध्यें स्मृतिकार, निबंधकार, प्रकरणग्रंथकार वगैरे प्राचीन धर्मशास्त्रांसंबंधीं लिहिणाऱ्या ग्रंथकारांस दत्तकप्रकरणासंबंधीं काय म्हणावयाचें आहे, तें अगदीं थोडक्यांत सारांशरूपानें एका ठिकाणीं पाहावयास मिळतें व त्यावरून आपण जी सुधारणा करण्याची इच्छा करितों, त्या सुधारणेस प्राचीन धर्मशास्त्र किती अनुकूल आहे, हेंही अनाशासें पाहावयास सांपडतें.

मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा, व मावशीचा मुलगा यांचें दत्तविधान कायद्यानें सामान्यतः अशास्त्र ठरविलें आहे. दत्तकपुत्र हा दत्तक घेणाराला "पुत्रच्छायावह" असला पाहिजे, इतकेंच मूळ शास्त्रांत आहे. याचा अर्थ "तच्च नियोगादिना स्वयमुत्पादनयोग्यत्वम्" असा नंदपंडितानें धडधडीत धर्मशास्त्राच्याविरुद्ध व चुकीचा लाविला, व सन्दरलंडसाहेबांनीं त्या नियोगाचें legal marriage असें भाषांतर करून या सर्व मूर्खपणावर कळस केला, व हा सर्व चुकीचा प्रकार आजतागायत कायदा म्हणून देशामध्यें रूढ होऊन बसला आहे. पुत्रच्छायावह या वचनाचा हा अर्थ जाचक होता, असा अभिप्राय न्यायमूर्ति रानडे यांचाही होता, असें स्पष्ट दिसतें. कारण १० मुं.ला. रिपोर्टर ३७२ या ठरावांत ते म्हणतात, "In so far as daughter's and sister's son are concerned, it is now too late on this side of India to raise that question which had been solemnly settled for the three higher castes." या संबंधीं धर्मशास्त्र काय आहे, हें या ग्रंथांत उत्कृष्ट रीतीनें पाहावयास सांपडतें.

"शौनकशाकलवृद्धगौतमादिवचोभ्योः दौहित्रभागिनेयमातृष्वसृसुता दत्त्रिमा न भवेयुरितिचेन्न । एषां वचसां याज्ञवल्क्यस्मृति, मिताक्षरा, अपरार्क, मनुस्मृति, तद्व्याख्यातृ मेधातिथि, गोविंदराज, सर्वज्ञनारायण, राघवानंद, नंदन, रामचंद्र, कुल्लूकभट्ट, निर्णयसिंधु, धर्मनौका, शूद्रकमलाकरादिप्राचीनार्वाचीनप्रामाणिकनिबंधेष्वनुल्लेखेन केनचिदाधुनिकेन प्रक्षितानीत्यतोऽनाकरत्वेनाप्रामाण्यात् ... धर्मद्वैतनिर्णये पुत्रपरिग्रहविधिसंशयोच्छेदपरिच्छेदे पदवाक्यप्रमाणपारावारपारीणभट्टशंकरैः । व्यवहारमयूखे भट्टनीलकण्ठैः । दत्तचंद्रिकायां श्रीमन्नागोजीभट्टैः । निर्णयसिन्धुटीकायां कृष्णंभट्टैश्च पूर्वोक्तवचांसि मीमांसाशास्त्रतः सम्यग्विविच्य **चातुर्वर्ण्ये दौहित्रभागिनेयौ दत्त्रिमौ भवत एवेति सिद्धांतितत्वात्** । किंच विरुद्धसंबधापत्यवर्जनांगीकारे शूद्रस्यापि दौहित्रभागिनेयौ दत्त्रिमौ नस्यातामेव । दुहितरि भगिन्यां च नियोगादिना स्वयमुत्पादनयोग्यत्वासम्मने शूद्रस्यापि कथं शौनकीयं शास्त्रमनुजानातीति सुधीभिरालोचनीयम् । **ततश्च दौहित्रभागिनेय मातृष्वसृसुता दत्त्रिमा भवंत्येवेति सिद्धम्** ।"

याकरितांच कायदेमंडळामधून कायदा पास करून हा जो चुकीचा कायदा रूढ झाला आहे तो पालटला पाहिजे. बॅरिस्टर जयकरांनीं तसा प्रयत्न केला होता. कारण त्यांनीं ॲसेंब्लीचे सभासद असतांना

" No adoption by a Hinnu shall be invalid by reason only that the adoptive father could not have legally married in her maiden state the genetive mother of the adopted son." असें प्रतिपादन केलें होतें. पण असेंब्लीची मुदत संपल्यामुळें तें बिल फुकट गेलें. आतां कोणी हिंदु-कायदाविशारद सभासद हें श्रेय घेईल काय ?

या ग्रंथामध्यें पृष्ठ ३७ पासून ४१ पर्यंत "दत्रिमादीनां गोत्रप्रवरा निर्णीयन्ते" असा उपक्रम करून दत्तकानें गोत्र व प्रवर कोणचे पाळावेत याबद्दल विवेचन केलें आहे, व या प्रसंगीं मनूच्या 'गोत्ररिक्थे जनयितुर्न भजेत् दत्रिमः सुतः' (९-१४२ मनु) या वचनाचा सविस्तर विचार केलेला आहे. व सर्व टीकाकारांचा व निबंधकारांचा आशय लक्षांत घेऊन ग्रंथकारानें 'केवलदत्रिमादिभिगोत्र-प्रवरसंबंधिषु विवाहादिसर्वस्थलेषु **पालकैकपितुर्गोत्रप्रवरा** वर्ज्यावर्ज्यतया स्वीकर्तव्या । असा सिद्धांत काढिला आहे. या बाबतींतील विचारसरणी पूर्णपणें सदोष आहे असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. मनूच्या वचनामध्यें गोत्र याचा अर्थ 'जनक घराण्यांतील गोत्र' असा करून दत्तक मुलानें तें गोत्र आपलें म्हणून समजूं नये असा होतो. असें असतां विवाहादि प्रसंगीं सुद्धा केवळ दत्तक गोत्राचा विचार करावयाचा व त्या बाबतींत जनक घराण्यांतील गोत्र बिलकुल विचारामध्यें घ्यावयाचें नाहीं, हा जो निर्णय ग्रंथकारांनीं काढला आहे तो चुकीचा आहे. ग्रंथकारांचें मत जर मानलें, तर एखादा इसम आपल्या जनक घराण्याच्या गोत्राहून भिन्न अशा परगोत्रांत जर दत्तक गेला, तर त्याला जनक गोत्रांतल्या आपल्या सख्ख्या बहिणीशीं विवाह करण्यास कांहीं बाध येणार नाहीं. ही अनर्थपरंपरा शास्त्रीय महाशयांस कबूल आहे काय ? सारांश, या बाबतींत वारे-शास्त्री सपशेल चुकलेले दिसतात, असें कष्टानें म्हणावें लागतें.

'ज्येष्ठपुत्रोऽपि देयः प्रतिगृहीतव्यश्च । ज्येष्ठदाने निषेधकताया अभावात् ।' असा निर्णय काढलेला आहे, तो बरोबर आहे. हल्लींचा हिंदु कायदाही या बाबतींत असाच आहे. परंतु एक पुत्रो न देयः हा सिद्धान्तही हिंदु-कायदा-सुधारकांनीं कायदेमंडळामधून कायदा करून अमलांत आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कन्या दत्तका न भवति ( पृष्ठ २२ ) हा सिद्धांत शास्त्रीबुवांनीं प्रस्थापित केला आहे, तोही स्मृतिवचनाप्रमाणें कितपत सशास्त्र आहे यासंबंधीं प्रस्तुत लेखकास शंका आहे. यासंबंधाचें सविस्तर विवेचन प्रस्तुत लेखकानें कन्या व दत्तकविधि ( विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९३१ ) या लेखांत केलें आहे, म्हणून येथें द्विरुक्ति करण्याची जरुरी नाहीं.

याप्रमाणें हिंदुकायदासुधारणेच्या दृष्टीनें या ग्रंथाचें महत्त्व काय आहे हें थोडक्यांत दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न येथें केला आहे. हा ग्रंथ प्राचीन परंपरेस चिकटून राहणाऱ्या, शास्त्रीलोकांमध्यें अग्रगण्य म्हणून समजल्या जाणाऱ्या वारेशास्त्री यांनीं लिहिला आहे व त्यामध्यें कांहीं ठिकाणीं प्राचीन स्मृतिशास्त्रांतील वचनांच्या परंपरागत अर्थास प्रतिकूल असे सिद्धांत काढले आहेत, हें पाहून आम्हांला त्याचें विशेष कौतुक वाटून त्यांना धन्यवाद द्यावेसे वाटतात, व हेंच उदाहरण इतर रूढिवादि शास्त्रीलोकांनीं अनुसरावें अशी आमची त्यांना आग्रहाची विनंती आहे. त्यामुळें महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक, तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, महादेवशास्त्री दिवेकर वगैरे शास्त्रीलोकांनीं हिंदुधर्मांतील खऱ्या तत्त्वांचें ज्ञान करून देण्याचा जो अत्यंत स्तुत्य उपक्रम सुरू केला आहे, त्याला थोडीफार चालना देण्याचें श्रेय त्यांना मिळेल.

पुस्तकाची भाषा सोपी असूनही प्राचीन सूत्रकारांच्या पद्धतीवरच गेली आहे. पुस्तकाची छपाई निर्णयसागरची असून बाह्यांगही सुंदर आहे. अशा या पुस्तकास धर्मशास्त्राची आस्था असणाऱ्या सर्व संस्कृतशिक्षणाभिमानि लोकांनीं आश्रय देऊन ग्रंथकाराच्या श्रमांचें चीज करावें.

---

# विजयनगरच्या दरबारीं गाजलेले अनेक माधव

[ लेखकः—शणै गोंय बाब ]

## लेखांक ४ था

( पृष्ठ २६६ वरून पुढें चालू )

विद्वान् संशोधक व इतिहासकार रावबहादुर डॉ. एस. कृष्णस्वामी अय्यंगर, एम. ए., ह्यांचेंही मत रावबहादुर आर. नरसिंहाचारांच्याच मताप्रमाणें आहे. ते म्हणतात ' विद्यारण्य ह्या नांवानें माधवाचार्यांचा स्पष्ट उल्लेख कोठेंच आढळत नाहीं हें जरी खरें आहे, तरी आख्यायिकांच्या द्वारें त्या नांवानें प्रसिद्ध असलेला पुरुष माधवाचार्यच होय, हें फार संभवनीय दिसतें. ' हें सिद्ध करण्यासाठीं ते चौण्डपाचार्य नांवाच्या ग्रंथकाराच्या प्रयोगरत्नमालेचा आधार देतात. हा ग्रंथ विद्यारण्याच्या विनंतीवरून लिहिला असल्याचें चौण्डपार्य म्हणतो,असें डॉ. अय्यंगर सांगतात, व त्यांतील कांहीं श्लोकांत विद्यारण्याला 'सांख्ययोगरहस्यज्ञ, ब्रह्मविद्यापरायण, वेदार्थविशदीकर्ता' वगैरे विशेषणें लावलेलीं पाहून, माधवाचार्याच्या वर्णनाशीं तीं हुबेहुब जुळतात असें म्हणतात.[९०] त्यांनीं दिलेल्या प्रयोगरत्नमालेंतील अवतरणांत विद्यारण्याच्या वर्णनानंतर दुसऱ्या बुक्काचा मुलगा भूपति ह्याच्या आज्ञेवरून तो ग्रंथ रचण्यांत आला, अशा अर्थाचाही मजकूर आहे.[९१] भूपतीचा उल्लेख शक १३३१ पासून शक १३४३ ( इ. स. १४०९–२१ ) पर्यंत आढळतो.[९२] ह्यावरून **विद्यारण्य समाधिस्थ झाल्यानंतर सुमारें बावीस वर्षांनीं** भूपतीच्या वहिवाटीस सुरवात झाल्यावर, प्रयोगरत्नमाला रचण्याची आज्ञा त्यानें केली असली पाहिजे, हें उघड आहे. असें असतां, **समाधिस्थ** विद्यारण्याच्या आज्ञेशीं ज्याअर्थीं ग्रंथाचा संबंध जोडण्यांत आला आहे, त्याअर्थीं ग्रंथाला महत्त्व देण्यापलीकडे इतर कारण नसावें किंवा तो मजकूर मागाहून कोणीतरी मध्येंच घुसडला असावा असें दिसतें. हें दुसरें अनुमानच बहुधा खरें असावें. कारण, प्रयोगरत्नमालेच्या दुसऱ्या **तीन** हस्तलिखितांत विद्यारण्याचें नांव व त्याचें वर्णन मुळींच नसून ' सायणार्याचा देह धारण करणारा माधवार्य अर्थात् सायणार्य हा वेदांचा व्याख्याता ' असें स्पष्ट म्हटलें आहे.[९३] ह्यावरून डॉ. अय्यंगर ह्यांस मिळालेल्या हस्तलिखितांतील मजकूर प्रक्षिप्त असावा, ह्या अनुमानाला विशेष बळकटी येते. दुसरें, वेदविद्येंत माधवाचार्याप्रमाणें विद्यारण्य पारंगत असला, म्हणून ते दोघेही एक म्हणण्यांत अर्थ नाहीं. समान विषयांत

९०. **पदवाक्यप्रमाणानां पारदृश्वा** महामतिः। **सांख्ययोगरहस्यज्ञो ब्रह्मविद्यापरायणः। वेदार्थविशदीकर्ता वेदवेदांगपारवित्। विद्यारण्ययतिर्ज्ञात्वा** श्रौतस्मार्तक्रियापरैः। श्रीचौण्डपार्यप्रमुखै विद्वद्भिर्ब्राह्मणोत्तमैः। व्याचक्ष्वाध्वरतंत्रं त्वं समंत्रार्थमिति स्फुटम्। Sources of विजयनगर History by S. Krishnaswami Ayyangar, M.A., Madras 1919, Introduction, pp. 3-4.

९१. स कदाचिद् **भूपतीन्द्रः** पालयन् धर्मतः प्रजाः। संप्रार्थितो द्विजैः श्रौतं विशदीकर्तुमुद्यतः। विचार्य विदुषां मध्ये चौण्डपार्यमदीदिशत्। वाचक्ष्वाध्वरतंत्रं त्वं समंत्रार्थमिति स्फुटम्। Sources of विजयनगर History, p. 55.

९२. Archaeological Survey of India, Annual Report 1907-8, Calcutta 1911, p. 246.

९३. **वेदान् व्याख्यान् माधवार्यः सायणार्यवपुर्धरः।** A Classified Index to the संस्कृत Mss. in the Palace at Tanjore by A. C. Burnell, Ph. D., London 1880, p. 16. A Descriptive Catalogue of the संस्कृत Mss. in the Tanjore Maharaja Serfoji's, सरस्वतीमहाल Library by P. P. S. Sastri, M. A., M. R. A. S., Srirangam 1929, vol. 4, No. 2048, 2049, 2050, pp. 1622, 1630, 1632.

सारखेच प्रवीण असलेले समकालीन पुरुष जगांत सांपडण्यास हरकत नाहीं. डॉ. अय्यंगरच्या अवतरणांत विद्यारण्याला 'वेदार्थविशदीकर्ता' असें म्हटलेलें आढळतें. परंतु प्रत्यक्ष त्याच्या हयातींत त्याला ती किंवा तशा अर्थाची पदवी लावलेली कोठेंच आढळत नाहीं. पहिला बुक्क व दुसरा हरिहर ह्यांच्याप्रमाणें त्याला 'वेदमार्गप्रतिष्ठाचार्य' ही पदवी लावली असल्याचें वर तिसऱ्या उल्लेखांत आलें आहे. परंतु तेवढ्यावरून तो वेदभाष्याचा कर्ता होता असें म्हणवत नाहीं. वेदभाष्यावर त्याची देखरेख होती व वेदविद्येंत तो प्रवीण होता, एवढ्यावरून त्याच्या गौरवासाठीं त्याला 'वेदार्थविशदीकर्ता' असें म्हटलें जाण्याचा संभव आहे. विद्यारण्याप्रमाणें विद्यातीर्थ व भारतीतीर्थ हे स्वामीही सांख्ययोगरहस्यज्ञ व ब्रह्मविद्यापरायण होते. माधवाचार्य व सायण ह्यांनीं विद्यातीर्थाचें वर्णन 'यस्य निश्वसितं वेदाः' ह्या शब्दांनीं केलें आहे.[९४] प्रत्यक्ष चौंडपाचार्यानें विद्यातीर्थ व भारतीतीर्थ ह्यांना विद्यारण्याप्रमाणेंच वेदांचे भाष्यकर्ते म्हटलें आहे.[९५] डॉ. अय्यंगर ह्यांच्या युक्तिवादाप्रमाणें त्यांचेंही वर्णन माधवाचार्यांच्या वर्णनाशीं हुबेहुब जुळतें. मग तेही माधवाचार्य होत, असें कां म्हणूं नये ? सारांश, डॉ. अय्यंगरचा मुद्दा टिकत नाहीं.

गेल्या वर्षी रा. रा. के. मार्कण्डेयशर्मा नांवाच्या एका संशोधकानें विद्यारण्यापासून माधवाचार्य वेगळा हा मुद्दा खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्यांत त्यांना यश आलेलें दिसत नाहीं. 'माधवाचार्य व विद्यारण्य ह्या दोन व्यक्ति एकच असत्या, तर एखाद्या तरी कोरींव लेखांत ही गोष्ट बाहेर फुटली असती; माधवाचार्यासंबंधाचे जे थोडेसे लेख आढळतात, त्यांत विद्यारण्याशीं त्याचा कांहींच संबंध दिसत नाहीं. ह्यावरून माधवाचार्य व विद्यारण्य परस्परांपासून भिन्न होत' अशी विरुद्ध पक्षाची बाजू मांडून रा.शर्मा म्हणतात, 'पूर्वाश्रमांतील नांवानें संन्याशाचा उल्लेख करण्याची चाल नाहीं. संन्यासाश्रमांत धारण केलेल्या 'विद्यारण्य' नांवाचा उल्लेख पूर्वाश्रमकाळीन कोरींव लेखांत कसा सांपडेल ?'[९६] हें त्यांचें म्हणणें मान्य करून व माधवाचार्य हाच विद्यारण्य हा मुद्दा क्षणभर गृहीत धरून त्यांना विचारतां येतें कीं, विद्यारण्य इ. स. १३८७ त समाधिस्थ झाला, ही गोष्ट निश्चित असतां, २४ वर्षांनंतरच्या म्हणजे इ. स. १४११ च्या हंपीजवळच्या शिलालेखांत माधवाचार्यांचा भाचा लक्ष्मण ह्यानें त्याचा उल्लेख **मादरस** ह्या पूर्वाश्रमांतील नांवानें कसा करावा ?[९७] हा शिलालेख विद्यारण्याचा पूर्वाश्रमकाळीन म्हणतां येईल काय ? दुसरें, प्रचलित आख्यायिकांप्रमाणें इ. स. १३३६ त (शक १२५८) विद्यारण्य संन्यासाश्रमी असून त्यानें पहिल्या हरिहराला विजयनगरच्या सिंहासनावर बसविलें. माधवाचार्य तर हरिहरामागून इ. स. १३५५ च्या सुमारास अभिषिक्त झालेल्या बुक्करायाचा आपण कुलगुरु व मंत्री असें सांगून आपलें नांव **माधव, माधवार्य** व **माधवामात्य** असें स्पष्ट देतो.[९८] आतां विद्यारण्य व माधवाचार्य हे दोघेही जर एकच होत, तर संन्यासाश्रमांत असतांना त्यानें आपलें पूर्वाश्रमांतील नांव कसें वापरावें ? तें त्यानें वापरलें आहे हें ज्यापक्षीं खोटें

९४. **यस्य निश्वसितं वेदा** मायया योऽखिलं जगत्। निर्ममे तमहं वंदे **विद्यातीर्थ**महेश्वरम्। वि. ज्ञा. विस्तार, व. ६३ पृ. ३०८, ३२५

९५. **श्रीभारतीतीर्थमुनिविद्यातीर्थमुनिश्वरौ। नमामि भाष्यकर्तारौ** त्रयीमयमहार्णवौ। चौण्डपार्यकृत आश्वलायनसंध्याभाष्य, A Triennial Catalogue of Mss. from 1919-22 for the Govt. Oriental Mss. Library, Madras, by महामहोपाध्याय **एस. कुप्पुस्वामी शास्त्री एम. ए.**, vol. 4. pt. 1, Madras 1927, R. No. 2920, p. 4215, Introduction p. 4.

९६. Indian Hist. Quarterly, vol. 8, p. 611.

९७. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३ पृ. ३२६.

९८. वि. ज्ञा. वि. व. ६३, पृ. ३०७-८.

नाहीं, त्यापक्षीं विद्यारण्य व माधवाचार्य ह्या दोन व्यक्ति एक नाहींत हें सहज सिद्ध होत नाहीं काय ?

जीवन्मुक्तिविवेक हा ग्रंथ पराशरस्मृतिव्याख्येच्या पुरवणीसारखा असून **माधवचार्यांचा** आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं.[९९] असें असतां, कांहीं हस्तलिखितांत नकलकारांनीं गैरसमजानें तो 'विद्यारण्यप्रणीत' म्हटलें आहे. ह्याचा फायदा घेऊन रा. शर्मा म्हणतात कीं विद्यारण्य व माधवाचार्य हे एकच होत.[१००] परंतु लगेच त्यांच्या मार्गांत एक मोठी धोंड येऊन पडते. जीवन्मुक्तिविवेक हा पराशरस्मृतीवरील ग्रंथमालेपैकीं एक ग्रंथ असून ही माळा गुंफून झाल्यावर जैमिनीयन्यायमालाविस्तर नांवाचा ग्रंथ रचण्यांत आला असें त्यांत स्पष्ट म्हटलें आहे व त्यांत कर्त्याचें नांव **माधव** असें दिलें आहे.[१०१] आतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, जीवन्मुक्तिविवेक रचण्याच्या वेळीं संन्यासाश्रमांत असलेल्या **विद्यारण्यानें** जैमिनीयन्यायमालाविस्तराच्या वेळीं पूर्वाश्रम स्वीकारून पुनः **माधव** नांव धारण केलें कीं काय ? रा. शर्मा ह्याचें काय उत्तर देतील ?

रा. शर्म्यांनीं आपल्या विरोधाच्या बळकटीसाठीं दोन नवीन पुरावे मांडले आहेत. (१) वीरमित्रोदयाचा कर्ता मित्रमिश्र ह्यानें व्यवहाराध्यायांत पराशरस्मृतिव्याख्येचा कर्ता विद्यारण्य असें म्हटलें आहे.[१०२] पराशरस्मृतिव्याख्येंत कर्त्याचें नांव माधव असें आहे. ह्यावरून माधवाचार्य व विद्यारण्य हीं दोन्ही नांवें एकाचींच होत, असें रा. शर्मा म्हणतात.[१०३] परंतु विद्यारण्याच्या मृत्यूनंतर सुमारें २५० वर्षांनीं मित्रमिश्रानें आपला ग्रंथ लिहिला असल्यामुळें त्याचें म्हणणें लक्षांत घेतां येत नाहीं. त्याच्यापूर्वी सुमारें १०० वर्षें विद्यारण्याविषयींच्या वऱ्याच खोट्यानाट्या आख्यायिका दृढमूल झाल्या होत्या, हें वर दाखविलेंच आहे. त्यांचीच आवृत्ति मित्रमिश्रानें आपल्या ग्रंथांत केल्यास नवल नाहीं.

(२) प्रयोगपारिजात नांवाच्या ग्रंथाचा कर्ता नरसिंह ह्यानें कालनिर्णय ऊर्फ काल-माधवीय ह्याचा रचणारा **विद्यारण्य** असें म्हटलें आहे.[१०४] कालनिर्णयाचा कर्ता माधवाचार्य हें प्रसिद्ध आहे. ह्यावरून विद्यारण्य व माधवाचार्य हे अभिन्न होत असें रा. शर्मा म्हणतात.[१०५] ते नरसिंहाला विद्यारण्याचा समकालीन ठरवून त्याचा काळ इ.स. १३६० पासून १४३५ पर्यंत देतात. परंतु ह्याला ते आधार देत नाहींत. प्रयोगपारिजातांत विद्यारण्याचा आणखीही उल्लेख आहे. त्यांत ऐतरेय ब्राह्मणांतील 'पूर्वां पौर्णमासीमुपवसेदिति' हें वचन देऊन, त्याचें स्पष्टीकरण **विद्यारण्यमुनींनें** केलें आहे असें म्हणून, 'खण्डतिथिवशाद्यदा' वगैरे उतारा दिला आहे.[१०६] ह्या उताऱ्याचा शोध करतां, तो

९९. वि. ज्ञा. विस्तार व. ६३ पृ ३०८-९.

१००. Indian Hist. quarterly, vol. 8, p. 612.

१०१. वि. ज्ञा. विस्तार. व. ६३, पृ ३०९.

१०२. व्याख्यातं चेदं शंखवचनं **विद्यारण्यश्रीचरणैः पराशरस्मृतिटीकायाम्** । पैतृकद्रव्यविभाग काले स्वधृतालंकारादिकमपि कन्या प्राप्नोतीत्याह शंख इति । वीरमित्रोदये व्यवहाराध्याये विभागाख्यव्यवहारपदम् २. १. २१. Translation by Golapchandra Sarkar Sastri, M. A., B. L., Calcutta 1879, p. 36.

१०३. Indian Hist. Quarterly, vol. 8. p. 614.

१०४. अत्र **श्रीमद्विद्यारण्यमुनींद्रैः कालनिर्णयप्रतिपादित**प्रकारः प्रदर्श्यते । तत्र पैठीनसिः— ' श्रौतस्मार्तक्रियाः सर्वा द्वादशे मासि कीर्तिताः । त्रयोदशे तु सर्वास्ता निष्फला इति कीर्तिताः' नृसिंहीय प्रयोगपारिजात, निर्णयसागर छापखाना, मुंबई १९१६, इष्ट्युपक्रमकालनिर्णय. पृ. ४१०-४११.

१०५. Indian Hist. quarterly, vol. 8, 614.

१०६. 'पूर्वां पौर्णमासीमुपवसेदिति पैंग्यमुत्तरामिति कौषीतकं या पूर्वापौर्णमासी साऽनुमतिर्योत्तरा सा राका' इति बह्वृच ब्राह्मणम् । अस्यार्थः **श्रीमद्विद्यारण्यमुनींद्रैः** स्पष्टीकृतः-खण्डतिथिवशाद्यदादिनद्वये पौर्णमासी तिथिः... पूर्वोक्तमतद्वयं द्रष्टव्यमिति । प्रयोगपारिजात, मुंबई १९१६, पर्वसंधिकालनिर्णय, पृ. ४१३.

विद्यारण्याचा किंवा माधवाचार्यांचा नसून **सायणाचार्यांचा** आहे असें आढळलें. ऐतरेय ब्राह्मणावरील भाष्य **सायणाचार्यांनें** केलें असून[१०७] त्यांत वरील मूळ वचन व त्याची टीका आहे. ह्यावरून प्रयोगपारिजातकाराला ग्रंथकर्त्याचें नांव बरोबर माहित नसावें किंवा नकलकारांनीं मूळ मजकुरांत फेरफार करून 'शुद्धिकरण' केलें असावें. हें दुसरें अनुमान बहुधा खरें असलें पाहिजे. कारण रा. शर्मा म्हणतात त्याप्रमाणें प्रयोगपारिजातकार खरोखरच विद्यारण्याचा समकालीन असेल, तर त्याच्या हातून ऐतरेय ब्राह्मणाच्या कर्त्याचें नांव भलतेंच लिहिलें जाणें शक्य नाहीं. त्यानें 'श्रीमत्सायणाचार्यैः स्पष्टीकृतः' किंवा 'माधवीये वेदार्थप्रकाशे' असेंच म्हटलें असलें पाहिजे. ह्याचें प्रत्यंतर प्रत्यक्ष प्रयोगपारिजातांतच एका ठिकाणीं पहावयास मिळतें. 'सूतिकानां शुद्धिकालः' ह्या प्रकरणांत माधवाचार्यांच्या पराशरस्मृतिव्याख्येंतील आचारकाण्डाच्या तिसऱ्या अध्यायांतील उतारा देतांना त्यानें **'माधवीये पराशरव्याख्यायाम्'** असें स्पष्ट म्हटलें आहे.[१०८] माधवाचार्य हाच विद्यारण्य असें त्याचें मत असतें, तर कालनिर्णयांतील उताऱ्यांत जसें 'विद्यारण्यमुनींद्रैः' असें वचन आढळतें, तसेंच ह्या ठिकाणींही तें आढळावयास पाहिजे होतें. तें ज्यापक्षीं आढळत नाहीं त्यापक्षीं एथें नकलकाराच्या 'शुद्धिकरणां'तून मूळ वचन कसें तरी निभावलें असेंच म्हणणें प्राप्त होतें. प्रयोगपारिजातांत मागाहून बरीच फिरवाफिरव व धुसडाधुसड झाली आहे ह्याचा पुरावा संपादकांनीं त्यांत दिला आहे.[१०९] ह्यावरून रा. शर्म्यांनीं कालनिर्णयांतील 'विद्यारण्यमुनींद्रैः' असें जें वचन दिलें आहे तें मागाहून कोणी तरी घातलेलें असून प्रयोगपारिजातांतील मूळ वचन **'माधवीये कालनिर्णये'** असेंच असलें पाहिजे.

वरील सर्व विवेचनावरून विद्यारण्य व माधवाचार्य ह्या दोन निरनिराळ्या व्यक्ति आहेत ह्यांत मुळींच संशय राहत नाहीं.

---

१०७. इति **श्रीमत्सायणाचार्यविरचिते** माधवीये वेदार्थप्रकाश **ऐतरेयब्राह्मणभाष्ये** द्वात्रिंशाध्याये **नवमः** खण्डः । ऐतरेयब्राह्मणम्, आनंदाश्रमसंस्कृतग्रंथावलिः पुणें १८९६, पृ. ८२७-२८.

१०८. **माधवीये पराशरव्याख्यायाम्**-'नित्यमन्नप्रदस्यापि कृच्छ्रचांद्रायणादिषु ।...देहे पितृषु तिष्ठत्सु नाशौचं विद्यते क्वचित्' इति. प्रयोगपारिजात, मुंबई १९१६, पृ. १५९.

१०९ **प्रक्षिप्त** भागः मुहूर्तसंग्रहे-' रेवतीहस्तमित्राश्वरोहिणीचंद्रवासवाः...नाशुभे नित्ययोगे च विशेनवसमाव्हयम् ' इति. प्रयोगपारिजात, मुंबई १९१६, पृ. ४२४-२५.

# वृत्तिसंशोधन

[ लेखकः—रा. रा. **गणेश रामकृष्ण हवलदार**, बी. ए., एल्एल्. बी. ]

( मागील अंकावरून पुढें चालू )

आली जशी जवळ वेळ, तशी सदांची ।
झाली निवांत कुजबूज सभासदांची. ॥
गार्ली कुणी स्थित करी गवई करांतें ।
वाद्यस्वरीं मिळवि नीट निज स्वरातें ॥५५॥

काव्यें जशा उठवितो कवि तो रसाऱ्या ।
गानें अजस्र उठवी लहरी स्वरांच्या ॥
रेखी स्वरें मग पटाविण गानचित्र ।
तें पाहण्यास बनती मम कान नेत्र. ॥५६॥

कोणी भरून गठडींत बरेंच तागे ।
पट्टी अयोमय करें वरि मारुं लागे ॥
तेव्हां करांतुनि तिचें निसटोनि टोंक ।
भिर्र् भिर्र् असे द्रुतगती रव काढि कैंक ॥५७॥

मारोनियां द्रुतगती अजि तेविं तान ।
श्रोत्यांपुढें उठवि हा गवई वितान. ॥
तो गारुडी बनुनि तन्मुख होत पुंगी ।
चक्षुश्रवांसम अम्हांसहि आणि गुंगी. ॥५८॥

तें ब्रह्म नादमय एक, तयांत आज ।
हा देहभाव विसरोनि विरे समाज. ॥
गाणें पुढें क्षणहि चालविण्यांत होती ।
सीमान्त सेवुनि सुखा रसहानिभीति. ॥५९॥

आली झणीं सम व गायक तेथ थांबे ।
"गाना अबी" कुणि म्हणे "सब हो गया बे ! " ॥
झाले सुरू जनमुखांतुन शब्द "वा ! वा !" ।
"जीते रहो !" "कवण तात तुझा स्तवावा ?" ॥ ६० ॥

याच्या पुढील दुसरे क्रम गायनाचे ।
व्हावे उद्यां मत पडे सगळ्या जनांचें ॥
घेऊन अत्तर गुलाब व तुरे व हार ।
जातां घरा म्हणति लोक 'कशी बहार !'॥६१॥

आलें मनांत पुशिलें गुरुतें "खरेंच ।
यांतील साध्य मज होइल का बरेंच ? " ॥
"विद्यार्जना" गुरु वदे "करि एक सेवा ।
नाहीं तिची बहुत आवड काय देवा ? ॥६२॥

जो गायनार्थ गुरुच्या गृहिं गेहिनीचीं ।
सप्रेम नित्य लुगडींहि धुवील नींची ॥
संगीतविद् करि तया गुरु हृष्टचित्त ।
कार्यें अशीं न घडवी नुसतेंच वित्त." ॥६३॥

सेवाप्रकार मजला इतका पुराणा ।
आतां रुचे न गुरुचा; पडलों शहाणा. ॥
देई न मान गुरु मासिक वेतना या ।
घेऊन मोल रडतां न असूं न माया. ॥६४॥

येई तयें प्रगति जींत दिसून कोती ।
प्रेष्ठा हि गायनकला मजला नको ती. ॥
आतां बघूं पुढिल साधन जीवनाचें ।
जें वित्तलभ्य म्हणुनी मम जीव नाचे. ॥६५॥

तत्रापि गीतसमतें अभिजात व्हावें ।
आणि प्रतिष्ठित म्हणोनि पुरीं रहावें ॥
जी ठाउकी मज न आज कशासि खावी ।
ती वाटली सुबक चित्रकला शिकावी. ॥६६॥

मीं शोधिला गुरु धुरंधर या कलेचा ।
हा योग होय विधिचा नच अक्कलेचा. ॥
अव्याकुलीं उपपुरांतिल भूविभागीं ।
कुंजांत शान्त तरुराजित एक जागीं ॥६७॥

होती विशाल व मनोहर चित्रशाला ।
जीमाजि नित्य शिकवी गुरु शिष्यमाला. ॥
ती पाहतांच मज ओळख आश्रमाची ।
झाली तशीच मम सार्थकता श्रमाची. ॥६८॥

अनुक्रमणिका

त्यांची तिथें बसुन पद्धत नीट हेरीं ।
ती येइ आढळुनियां मजला दुहेरी ॥
एकींत ठेवि पुढतीं प्रतिमा चितारी ।
त्यातें दुजींत परि कल्पक बुद्धि तारी. ॥६९॥

कांहीं स्त्रिया पुरुष, घेउनि कूर्च हातीं ।
काढून चित्र फलकावरतीं पहाती. ॥
घेण्यास गूण फिरतां त्यजुनी टिकेचा ।
मी मात्र संथ धरिला पथ वाटिकेचा. ॥७०॥

सीता काढि कुणी पथीं विरमतां गोदातटीं भीतरी ।
येतां पोपट नासिकेस बघण्या हंसी गतीला तरी ॥
मानी मोर पहावया कबरिला, नागीण वेणीस ती ।
रागी राम खगामृगांस पुसण्या कोठें रमे ती सती!॥७१॥

कोणी पिप्पलवृक्ष रेखि फुटतां वासंतिकी पालवी ।
झाली जी अति लाल बाल किरणें पाडी वरी जों रवी ॥
तेणें आश्रित पक्षिसंघ परते तत्काल कोलाहलें ।
मानी लागलि आग या तरुस, ती भक्षील सारीं पिलें ! ॥ ७२ ॥

येवोनी उदयाचलीं उजळवी तेजें रवी दिङ्मुखें ।
काळोखा गिरिगव्हरांतहि कुठें थारा न देई सुखें ॥
काढोनी तिमिरारिचा पट असा कोणी वरी टांगला ।
तो रात्रीं दिसण्यास खोलिंत दिवा मोठा हवा लागला ! ॥ ७३ ॥

जो, विश्वचक्षुरविचा पट काढि आणि ।
लोकां न रात्रिस दिसे मग दीप आणि ॥
तो चित्रकार कसला ! अथवा तयाची ।
वाटे समग्र मज चित्रकला चुक्यांची ! ॥७४॥

कोणी रूपवती पटावरि करें रेखी रतीचा पति ।
देई शेवटिं सज्ज पुष्पमय तें त्याच्या करीं चाप ती ॥
पाही जों निरखोनि काय उरलें तो त्या अनंगें उरीं ।
केलें विद्ध शरें तिला मग पडे घायाळ ती भूवरी ! ॥७५॥

निर्जीव हें मदन चित्र सजीव कैसें ? ।
स्त्रीचें सजीव वपु तें गतजीव कैसें ? ॥
झाली दशा मम अशीच म्हणाल कांहीं ।
नाहीं सजीव अथवा गतजीव नाहीं ! ॥७६॥

आलें मनीं व ठरलें असली चुक्यांची ।
मातें नको मुळिंच चित्रकला मुक्यांची ॥
वक्तृत्व एकचि कला प्रिय बोलक्यांची ।
झाली पसंत मज तूर्त तरी फुकाची. ॥७७॥

वाक्पण्डितास मग धुण्डित अन्य गांवा ।
गेलों तिथें मग मिळे सहजीं सुगावा ॥
मी शिष्य तो गुरु असें जुळतांचि नातें ।
देई विदग्ध गुरु वाचिक शिक्षणातें ॥ ७८ ॥

बोले "पहा पुढति सागर शान्त सारा ।
एकीसही वरि नसे लहरीस थारा ॥
खेळांतल्या सम लहान लहान होड्या ।
शीडाशिवाय फिरतात परी न थोड्या ॥७९ ॥

वारे परंतु सुटतील प्रचण्ड जेव्हां ।
प्रक्षुब्ध भेटतिल वीचि नभास तेव्हां ॥
प्राण्यां अशा प्रलय संकटिं वांचवाया ।
ईशाविणें इतर ते सगळेच वांया ! ॥ ८० ॥

मानीं समाज तंव सागर शान्त सारा ।
वक्ता करी क्षुभित त्यास भयाण वारा ॥
प्रक्षुब्ध चित्त जनता जर मोडि पंथ ।
तीतें करी तर जनार्दन एक संथ ! ॥ ८१ ॥

लोकस्वरूप तृण, वक्तृवचःस्फुलिंग ।
हीं दोन लावतिल देशवनास आग ॥
वक्तृप्रभाव असला वद कोण मोजी ।
जोडा दुरून कर आणि म्हणा नमोजी ! ॥८२॥

अन्याय कल्पित अकल्पित आणि वक्ता ।
श्रोत्यां सशक्त करितात क्षणीं अशक्तां ॥
ते श्रोतृहस्त बनती मणि चुंबकाचे ।
सोंटेहि राशिगत लोह विलोभि साचें !"॥८३॥

या ऐकतां गुरुमुखांतुनि सूचना मो।
झाला अचिंत्य परिणाम खराच नामी ॥
कर्णांत शब्द उठले व मनीं विचार।
रूपें अनेक दिसलीं नयनांसमूर ॥ ८४ ॥

तें स्वच्छ तें मलिन तें सकटांत जाळी।
ती आग भासलि पुढें करिते धुमाळी।
'मारा' गमे कुणि म्हणे, कुणि तोंच मारी!
वाटे उठेल वळ पाठिवरी विखारी! ॥ ८५ ॥

वक्तृत्व सक्रिय कला नच कोमला ही।
तुम्हां नको तर नकोच नको मलाही।
ती मात्र निष्क्रिय कवित्व कला शिकों दे।
सद्यःचिदंबरिं जिनें मुदचंद्र कोंदे. ॥८६॥

सोडून सांवलिस पावु, न हानि रोप।
मीं घेतला म्हणुनियां गुरुचा निरोप।
मीं शोधितां पथिं मिळे कविंची विशाळा।
तें ब्रह्म विस्मृत तशी जवळीच शाळा. ॥८७॥

आनंद शाश्वत व चिन्मय जींत नांदे।
जी भारली कविकृतिध्वनिच्या निनादें।
तींत प्रवेश करितां गुरुदर्शनानें।
मातें मिळे सुख जसें मिळतें सणानें. ॥८८॥

शिष्या धडे शिकवितां गुरु तो न कोपे।
सांगे "कवित्व करणें सगळ्यांत सोपें।
मोठा बने विषय तुच्छ व तुच्छ मोठा।
आतां पुरे झुरळ, नारळ आणि रोंठा ॥८९॥

भेंडा, मुदी, विरवल्या, सरडा विषारी।
सौन्दर्य यांत बघ लावुनि दृष्टि सारी।
आतां हिमालय नको जनमानदण्ड।
गंगा नको अजि नद्यांत नदी प्रचंड. ॥९०॥

आतां पुरे शिनळ टेंकडि ती विलोक।
ओढा पुरे म्हणति आंबिल ज्यास लोक ॥
आतां नको समर कौरव-पाण्डवांचें।
झोंबी पुरे करिति मद्यपि नित्य वाचे. ॥९१॥

साप्ताहिकांत अथवा कुणि आन्हिकांत।
व्यक्तीच वाद करती पुरतो नितान्त।
स्त्रीवर्णनांत बन बुद्धिविहीन वेडा!।
काव्यीं तुझ्या नच पडेल तयें बखेडा!" ॥९२॥

'ही व्यावहारिक कला कळतां कवींची।
मन्मानसांत उठल्या रसपूर्ण वीची! ॥
झाले क्षणीं मुदभरें नयन प्रफुल्ल।
आले फुगून वर भाविसुखांत गल्ल. ॥९३॥

स्त्रीतें जरी धरि जमेस कधीं न संत।
स्त्री हा सुचे विषय आणि पडे पसंत।
केशान्त सौष्ठव तिच्या तनुचें नखाद्य।
जें, तें, निवेदुनि दिलें कवितेस खाद्य ॥९४॥

या नित्य काव्यघनवृष्टिमुळें समोर।
लागे करूं रसिक नर्तन जेविं मोर॥
एका स्थलीं ठरविला मम काव्यपाठ।
आले तिथें रसिक थोपटण्यास पाठ ॥ ९५ ॥

आले कुमार, सुत, बन्धु कलाविलास।
रूपें विभिन्न धरुनी जणुं कालिदास ॥
उच्चस्थलस्थित गुरूसम पूर्ण दृष्टि।
त्यांची करी मजवरी अमृतार्कवृष्टि. ॥ ९६ ॥

लागे परन्तु मज एक अपूर्व शोध।
कीं भामिनी कुणि टपे करण्या विरोध ॥
होती तिच्यासह तिची बहुभार सेना।
क्षोभामुळें लवहि निश्चळ ती बसेना ॥ ९७ ॥

नौकावली गमलि ती बघतां तऱ्हा हे।
क्षुब्धोर्मि सिन्धुंत बुडें हलवीत राहे! ॥
आश्चर्यवत् बघति जों जन निर्निमेष।
तों वेळ झालि न कळे उरली न शेष ॥ ९८ ॥

झालों स्थलीं उचित शीघ्र विराजमान।
जोडून हात विनयें लववून मान ॥
प्रास्ताविकस्तवन साधुन काव्य गीत।
गाणार मीं तव कुणी महिला विनीत ॥ ९९ ॥

राहे उभी कमलिनीच सभातडागीं ।
खोंवी कटीस पदरा, मनिं त्वेत डागी. ।।
बोले " मधेंच उठुनी वदणें न नीट ।
कांहीं प्रसंगचि परी करितात धीट ।। १०० ।।

कालस्वरूप शरमा अज ज्यांस वीते ।
स्त्री हाच त्यां विषय एक सुचे कवींतें. ।
आणावयास जल जा जमुनातटाकीं ।
हा काव्यकंटक पथांत रचून टाकी ! ।।१०१।।

बागेंत जाउं जर वेंचु कळ्या म्हणून ।
राही तिथें हजर हा उकळ्या फुटून ।
जा पर्वतीस तिथुनी पुजण्या उमेला ।
येते शिवी मुखिं, दिसेल तिथेंहि मेला ! ।।१०२।।

सौंदर्य जें अवयवीं दिसतें स्त्रियांचे ।
रोखून त्यास कविकाव्य करी सदांचें ।।
त्रस्त स्त्रियांस करि यापरि यातनांहीं ।
मीं सांगतें मुळिंच पौरुष यांत नाहीं ।।१०३।।

जी वीरसू म्हणुनियां कविता विराजे ।
स्त्रैण प्रजा तिस अशा कविची न साजे ।।
गर्जद् गभीर कवितासुत सिंहनादें ।
जीर्णाटवीस्थितमदांध करी न नांदे ! ।।१०४।।

आत्मैक्य, विश्वहित, , आणिक वैरनाश ।
निःस्वार्थता विषय घेउन उज्ज्वलांश ।।
शृंगार वीरकरुणादि नऊ रसांचे ।
वागीश्वरीस भज वाहुन हार साचे" ।।१०५।।

अन्तीं कटाक्ष विखरून सभोंवतालीं ।
ती स्त्री निघे चरण टाकुन मत्ततालीं. ।।
जाई तिला अनुसरून फरा स्त्रियांचा ।
तत्त्वार्थ हा जणुं लढे गण राष्ट्रियांचा. ।।१०६

दाक्षिण्ययुक्त कुणि देइ तयांस टाळी ।
सन्मान हा कुणि तटस्थ म्हणून टाळी. ।।
तेथेंच पक्ष तिसरा करण्या टवाळी ।
टाळीच देत सुटला मग एक काळीं ! ।।१०७।।

तेव्हां अचिन्त्य रसहानि सभेंत झाली ।
माझीहि काव्यपठनोत्सुकता विझाली. ।।
संकल्पित क्रम तसे सहजीं गळाले ।
गेले सभासद घरोघर वेगळाले. ।। १०८ ।।

जी ईश्वरी कृति असे प्रथम प्रकृष्ट ।
तत्त्वज्ञ जी प्रकृति जाणुनि होति हृष्ट ।।
ती स्त्री अशी रुसवुनी अजि आदिमाया ।
ईर्ष्या कशी मनिं उरे मज काव्य गाया।।१०९

ती 'वैरनाश' सुचवी विषय प्रचण्ड ।
घालूं शके गवसणींत न पद्मजाण्ड ।।
त्यांतें महाकवि हवा न चले हवा तो ।
रात्रौ न कार्य विधुचें करि काजवा तो ! ।।११०

चण्डी म्हणे लघुकवींत मुळीं न अर्थ ।
व्हाया महाकवि नसे कविते ! समर्थ ।।
आतां निरर्थ तुज आळविणार नाहीं ।
ही लेखणी उगिच काव्य विणार नाहीं. ।।१११

मध्येंच काव्यरथ थांबवितां सवेग ।
हा स्फूर्तिरूप हय तोडुन बंद तंग ।।
रेखी खुरें न तळ, येउनियां उपायीं ।
गेला पळून इथुनी भरधांव पायीं ! ।। ११२।।

वृत्तें तशींच यमकें मज बन्धनेंच ।
होतीं छळीत जणु मल्लवरास पेंच ।।
तोडून तीं सकल गद्यनभीं अपार ।
झालों विमुक्त करण्या खगसा विहार. ।।११३

वार्ता पुरांत पसरे न म्हणा अपूर्व ।
दे जन्म गद्यरविला अजि पद्यपूर्व ।।
'सन्मानकृत्य करुं' हा धरुनी विचार ।
गेले खगासम पुढें बहु गद्यकार ।। ११४ ।।

आले न जों इतर लोक मजा बघाया ।
तों एक वृत्तहर ये मम जाब घ्याया. ।।
" वार्ता पुरा पुरवुनी उपजीविका मी ।
साधीं" म्हणे तुजहि येइन तेंवि कामीं. ।।११५

( अपूर्ण )

# पातंजल-महाभाष्य

[ भाषांतरकार—महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर ]

## थोडीशी प्रास्ताविक माहिती

[ लेखक—पंडित रंगाचार्य रड्डी ]

पुणें येथील प्राच्यविद्यासंशोधनमंदिर या संस्थेनें सुमारें आठ वर्षांपूर्वी पातंजलमहाभाष्याचें इंग्रजींत भाषांतर करून तें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें व तें काम प्रो. काशीनाथपंत अभ्यंकर, एम्. ए. ( गुजरात कॉलेज, अहमदाबाद ) यांजकडे दिलें. प्रो. काशीनाथपंत स्वतः सुबुद्ध व व्याकरणविषय घेऊन एम्. ए. झाले असल्यामुळें या महत्त्वाच्या कार्याला तेच अधिकारी आहेत अशी सदर संस्थेच्या व्यवस्थापकमंडळीची भावना असावी व ती युक्तही आहे. शिवाय आज मुंबई इलाख्यांत व्याकरणविषयांत ज्यांच्याइतका अधिकारी दुर्मिळ अशा म. म. वासुदेवशास्त्रीबुवा अभ्यंकर ( प्रो. काशीनाथपंत यांचे तीर्थरूप ) यांचीही या कार्यांत उपयुक्त मदत होऊन हें कार्य उत्तम रीतीनें शेवटास जाईल अशीही मंडळाची भावना असावी व तीही सर्वथा उचितच आहे. याप्रमाणें हें काम प्रो. अभ्यंकर यांजकडे आल्यावर कांहीं प्राचीन विद्वान् मंडळींनीं—ज्यांस इंग्रजी भाषेचा विशेष परिचय नाहीं अशा लोकांनीं—म. म. अभ्यंकरशास्त्रीबुवांस " आपणास आतां महाभाष्यावर विशेष परिशीलन करावें लागेल, तेव्हां आपण या वेळीं याचें मराठी भाषांतर केलें तर तें आम्हां प्राचीन संप्रदायी विद्वद्वर्गास विशेष उपयुक्त होईल व आपणासही यासंबंधानें आतां विशेष परिश्रम करावे लागणार नाहींत. तेव्हां आपण मराठी भाषांतर करावें. " अशी विनंती केली. म. म. शास्त्रीबुवांनीं शांकरभाष्याचें भाषांतर केलेलें पुष्कळ विद्वानांनीं परिशीलित असल्यामुळें शास्त्रीबुवांचा प्रगल्भ शास्त्रीय ग्रंथाचें सोपपत्तिक व सुबोध भाषांतर करण्याचा अधिकार विशेष आहे हें त्यांस अवगत आहेच. त्यामुळें त्यांची ही विनंती अत्यंत योग्य होती असें कोण म्हणणार नाहीं ?

असो. पुढें मंडळींच्या सूचनेप्रमाणें शास्त्रीबुवांनीं ५।६ वर्षें परिश्रम करून संपूर्ण भाष्याचें भाषांतर तयार केलें व पुढें तें प्रसिद्ध करण्याचा ते विचार करूं लागले. तेव्हां हें प्रकाशनाचें काम पुणें येथील वेदशास्त्रोत्तेजक सभा या संस्थेनें करावें व त्यास लागणारा खर्च पुस्तकविक्रीच्या प्राप्तींतून प्रथम काढून घेऊन नंतर पुस्तकाची जी प्राप्ति होईल ती शास्त्रीबुवांस द्यावी; सदरहु पुस्तकाचा योग्य रीतीनें खप होण्यास आपण शक्य ती खटपट करूं, अशी कांहीं मंडळींनीं वेदशास्त्रोत्तेजक संस्थेस सूचना केली. त्यांत डॉ. बेलवलकर वगैरे मंडळी प्रमुख होती. ही सूचना सभेच्या नियामक मंडळांत पास झाली व संस्थेच्या आश्रयानें प्रेस कॉपी तयार करण्याचें कामही सुरू झालें. परंतु पुढें लवकरच पुण्याच्या वातावरणाच्या गुणाप्रमाणें या सत्कार्यांत नानाप्रकारच्या भानगडी कांहीं विद्वच्छिखामणींनीं उपस्थित करून या कार्यास मोड घातला. याबद्दल डॉ. बेलवलकर ( वरील संस्थेचे सन्मान्य सभासद ) व प्रो. नाईक सदर संस्थेचे कार्यवाहक यांस विशेष

वाईट वाटलें. यासंबधींचा इतिहास मोठा मनोरंजक आहे; परंतु तो प्रकृतस्थलीं अनुपयुक्त असल्यामुळें व वैरस्योत्पादक असल्यामुळें आम्ही येथें देत नाहीं. पुढें इतर कांहीं संस्थाही हें काम करण्यास तयार झाल्या. परंतु त्यांच्या कार्यक्रमांत विविध कार्यें असल्यामुळें हें काम फार विलंबानें होईल असें वाटूं लागलें. हें काम आज छापण्यास सुरू केलें तरी तें संपूर्ण होण्यास ३।४ वर्षे सहज लागतील. शास्त्रीबुवांचें वयोमान आज पाउणशेंच्या जवळ आलेलें आहे. तेव्हां प्रुफें वगेरे तपासण्याची दगदग तरी यापुढें त्यांना किती झेपेल वगेरे गोष्टींचा विचार करून आम्ही विविधज्ञानविस्ताराच्या विद्वान संपादकांस भाष्यांतील पहिलें 'पस्पशान्हिक' विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध करण्याविषयीं विनंती केली व ती त्यांनीं मान्य केल्यामुळें हें प्रथमान्हिक आज छापून प्रसिद्ध होत आहे. हें वाचकांस मान्य झाल्यावर पुढील भाग छापण्याची कांहीं तरी योजना करतां येईल. तात्पर्य, प्रस्तुतचा भाग वाचकांस कसा काय पसंत पडतो हें पाहण्याकरितां हें प्रथमान्हिक प्रसिद्ध होत असून, पुढील कार्य त्यांच्या प्रोत्साहनावर अवलंबून राहणार आहे.

सर्व संस्कृत वाङ्मयांत व्याकरणशास्त्र हें गहन असून त्यावर अनेक उत्तम बुद्धिमान पंडितांनीं विचारपरिप्लुत ग्रंथ केले आहेत. हे सर्व ग्रंथकार पातंजलमहाभाष्यास फार महत्त्व देतात. 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' या परिभाषेप्रमाणें व्याकरणशास्त्रांत भगवान् पतंजलीला प्रमाणमूर्धन्यत्व प्राप्त झालेलें आहे. 'महाभाष्यं वा पाठनीयं महाराज्यं वा पालनीयम्' हा वैयाकरणांचा उद्‌घोष ह्या ग्रंथाचें अलौकिकत्व प्रस्थापित करीत आहे. अर्वाचीन संशोधकांनाही पतंजलीचें महाभाष्य हें प्राचीन कालविवेचनमहोदधींतील दीपस्तंभ होऊन बसलें आहे. यांतील विविध प्रकारच्या उल्लेखांवरून तत्कालीन राजे, परकीयांचे भरतखंडावर झालेले हल्ले, समाजस्थिति, धार्मिक व्यवहार, वगैरे अनेक गोष्टी स्पष्ट कळून येतात. त्याचें सविस्तर विवेचन या पुस्तकास जी विस्तृत प्रस्तावना लिहावी लागेल त्यांत येईलच. या अत्यल्प प्रस्तावनेंत तें देणें शक्य नाहीं. तात्पर्य पातंजलमहाभाष्य हा सर्व तऱ्हेनें उपयुक्त असा दोन हजार वर्षांच्या पूर्वीची माहिती देणारा सर्वमान्य ग्रंथ आहे. तेव्हां त्याचें मराठींत भाषांतर होऊन सर्व समाजाला तें सुलभ करून देणें हें विद्वानांचें व धनिक संस्थानिकांचें पवित्र कर्तव्य आहे. त्यापैकीं प्रथम वर्गाचें जें कर्तव्य भाषांतर करणें तें करून शास्त्रीबुवा मुक्त झाले आहेत. आतां धनिकवर्गानें आपलें कर्तव्य करून हें कार्य शेवटास न्यावें अशी आमची त्यांस सविनय विनंती आहे. या वेळीं शास्त्रीबुवांच्या घराण्याची व परंपरेची माहिती देणें उपयुक्त आहे. परंतु विस्ताराला भिऊन पुढें ती, विस्तृत प्रस्तावना लिहिण्याचा प्रसंग येईल त्या वेळेस देऊं, अशी सद्भावना वाचकवर्गास निवेदित करून ही अल्प प्रस्तावना पुरी करतों.

---

# पातंजलमहाभाष्य

## प्रथमान्हिक–पस्पशान्हिक

**॥ अथ शब्दानुशासनम् ॥**

आतां शब्दशास्त्र लिहिण्यास आरंभ करितों.

येथें ‘अथ’ हा शब्द अधिकार या अर्थी घालण्यांत आला आहे. ‘शब्दानुशासन’ या नांवाच्या शास्त्राचा अधिकार म्हणजे प्रारंभ केला आहे असें समजावें.

कोणत्या शब्दांचें शास्त्र ?

लौकिक व वैदिक दोन्ही शब्दांचें शास्त्र. त्यांपकीं लौकिक शब्द म्हणजे गौः, अश्वः, पुरुषः, हस्ती, शकुनिः, मृगः, ब्राह्मणः इत्यादि इत्यादि. वैदिक शब्द म्हणजे “शं नो देवीरभिष्टये”, “इषे त्वोर्जे त्वा”, “अग्निमीळे पुरोहितम्” “अग्न आयाहि वीतये” इत्यादि इत्यादि.

बरें, तर, “गौः” या ठिकाणीं शब्द कोणता, म्हणजे शब्द कशाला म्हणावयाचें ? जो तो पोळी, शेंपूट, वशिंड, खूर व शिंग असलेला पदार्थ म्हणजे प्राणी तो का शब्द ? आम्ही म्हणतों कीं तो नव्हे शब्द; त्याला द्रव्य म्हणावयाचें.

बरें, तर जें तें खुणविणें, चळवळ करणें, डोळे मिटणें उघडणें तो का शब्द ? आम्हीं म्हणतों कीं तोही शब्द नव्हे; त्याला क्रिया म्हणावयाचें.

बरें, तर, जो तो पांढरेपणा, निळेपणा, काळेपणा, पिंगटपणा किंवा पारवेपणा तो का शब्द ? आम्हीं म्हणतों तोही शब्द नव्हे; त्याला गुण म्हणावयाचें.

बरें, तर, निरनिराळ्या व्यक्तींमध्यें जें प्रत्येकींत तेंच म्हणून दिसतें, किंवा व्यक्ति मोडली, तोडली तरी जें कायम राहतें असें जें सामान्य स्वरूप तें का शब्द ? आम्हीं म्हणतों, तें स्वरूप शब्द नव्हे, त्याला आकृति म्हणावयाचें.

तर मग शब्द कोणता ?

शब्द तो कीं, जो उच्चारिला असतां पोळी, शेपूट, वशिंड, खूर व शिंग हे असलेली व्यक्ति समजते तो शब्द[1]; अथवा हेंच दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे ज्याच्यापासून व्यवहारांत पदार्थाचें ज्ञान होतें असा जो ध्वनि म्हणजे आवाज त्याला लोकांत शब्द म्हणतात. उदाहरणार्थ—तोंडानें वर्णोच्चार करणाऱ्याला म्हणतात ‘चालूं दे तुझा शब्दोच्चार’, ‘बोलूं नको शब्द’, ‘हा माणवक फार शब्द करणारा आहे’ वगैरे वगैरे. तेव्हां आवाज[2] किंवा वर्णोच्चार हाच शब्द होय.

बरें; तर हें शब्दशास्त्र शिकण्याचे फायदे काय ?

**रक्षोहागमलध्वसंदेहाः प्रयोजनम् ।**

रक्षण, विभक्ति बदलणें, वेदाध्ययन, सौलभ्य, व संशयराहित्य हे शब्दशास्त्र शिकण्याचे फायदे आहेतः— वेदांचें रक्षण करण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करावयास पाहिजे; कारण ज्या मनुष्याला लोप, आगम व वर्णांची बदल यांचें ज्ञान असेल तो मनुष्य वेदांचें चांगल्या रीतीनें रक्षण करील[3].

ऊह म्हणजे विभक्ति बदलणें हाही फायदा आहे— वेदामध्यें जे मंत्र उच्चारले आहेत, त्यांमध्यें सर्व लिङ्गें व सर्व विभक्ति लावून शब्दांचे प्रयोग केले नाहींत; यज्ञकर्त्याला यज्ञाच्या वेळीं त्यांमध्यें योग्य तो विभक्तींचा किंवा लिंगांचा फेरबदल करावा लागतो; व व्याकरण न पढलेल्या माणसाला तो फेरबदल योग्य रीतीनें करतां येणें शक्य नसतें. तेव्हां ऊह म्हणजे शब्दांच्या लिंगविभक्तींचा फेरबदल करण्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर[4] आहे. आगम[5] म्हणजे वेद, हाही व्याकरणाचें अध्ययन करण्याला कारणीभूत आहे. “ब्राह्मणानें ‘कशाकरितां’ असा प्रश्न न करितां धर्मस्वरूप जो सहा अंगांनीं संपन्न वेद त्याचें पठण करावें व अर्थज्ञान संपादन करावें.” हें वचन सर्वविश्रुत आहे. वेदाच्या सहा अंगांमध्यें व्याकरण हें तर मुख्य अंग आहे; व मुख्य अंगांच्याकरितां केलेल्या प्रयत्नाला चांगलेंच फळ मिळतें. तसेंच सौलभ्यानें शब्दार्थज्ञान होण्या-

अनुक्रमणिका

करितां व्याकरण पढावयास पाहिजेच. ब्राह्मणानें अवश्य शब्दांचें ज्ञान संपादन केलें पाहिजे हें सर्वांना माहीतच आहे; व व्याकरणाशिवाय दुसऱ्या कोणत्याही सोप्या उपायानें शब्दांचें ज्ञान होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें संशयराहित्याकरितां[६] व्याकरणाचें अध्ययन करावयास पाहिजे. याज्ञिक लोक वाक्य म्हणतात— " स्थूलपृषतीं आग्निवारुणीं अनड्वाहीं आलभेत " म्हणजे स्थूलपृषती अशा गाईचा अग्नि व वरुण या दोन देवतांना उद्देशून बली द्यावा. या वाक्यांत स्थूलपृषती शब्दाच्या अर्थाविषयीं संशय येतो–स्थूल पृषती म्हणजे स्थूल व पृषती, म्हणजे धिप्पाड व ठिपक्याठिपक्याची, का स्थूलपृषती म्हणजे जिला स्थूलपृषत म्हणजे मोठेमोठे ठिपके आंगावर आहेत अशी ? स्वरावरून येथें अर्थाचा निश्चय करतां येतो– जर पूर्वपद जें स्थूल याचे स्वर स्थूलपृषती या समासांत कायम राहिले असतील तर हा बहुव्रीहि समास आहे; पण जर शेवटचा स्वर म्हणजे ती येथील ई हा उदात्त असेल तर हा तत्पुरुषसमास आहे. पण ज्यानें व्याकरण म्हटलें नाहीं, त्याला स्वरावरून स्थूलपृषती या शब्दाच्या अर्थाचा निर्णय करतां येणार नाहीं.

खालीं दिलेले आणखीही शब्दशास्त्र अध्ययन करण्याचे फायदे आहेतः—तेऽसुराः०, दुष्टः शब्दः०, यदधीतम्०, यस्तु प्रयुङ्क्ते०, अविद्वांसः०, विभक्तिं कुर्वन्ति०, यो वा इमाम्०, चत्वारि०, उत त्वः०, सक्तुमिव०, सारस्वतीम्०, दशम्यां पुत्रस्य०, सुदेवो असि वरुण० हे ते होत. त्यांपैकीं— तेऽसुराः० याचा अर्थ—ते दैत्य ' हेऽरयः, हेऽरयः ' ( म्हणजे अरे शत्रूंनो, अरे शत्रूंनो, याचे ऐवजीं ' हेलयो, हेलयः ' ) असें ओरडले व त्यांचा पराभव झाला, म्हणून ब्राह्मणानें म्लेच्छन करूं नये म्हणजे अशुद्ध शब्द बोलूं नये; म्लेच्छ म्हणजे अपशब्द होय. आपल्या तोंडांतून अपशब्द निघूं नयेत म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां "दुष्टः शब्दः" याचा अर्थः—" स्वरानें किंवा वर्णानें अशुद्ध शब्द हा बरोबर न योजल्यामुळें योग्य अर्थ प्रतिपादन करीत नाहीं. असा शब्द हा वज्रासारखा होतो व ज्याप्रमाणें इन्द्रशत्रु[१०] या शब्दानें स्वरचुकीमुळें यजमानाचाच नाश केला, त्याप्रमाणें हा शब्दही यजमानाचा नाश करतो. भलत्या म्हणजे चुकीच्या शब्दांचा आपण प्रयोग करूं नये म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

" यदधीतम् " याचा अर्थ—ज्याचें अध्ययन केलें, पण ज्याचा अर्थ कळला नाहीं; थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे जें केवळ शब्दतःच उच्चारण केलें जातें असें शुष्क अध्ययन. ज्याप्रमाणें शुष्क लांकूड अग्निशिवाय मुळींच जळत नाहीं, त्याप्रमाणें मुळींच प्रकाशमान होत[११] नाहीं. म्हणून, अर्थ कळल्याशिवाय अध्ययन करूं नये, म्हणून व्याकरण म्हणावें.

"यस्तु प्रयुङ्क्ते" या श्लोकाचा अर्थ—शब्दाच्या व्यवहारांत सूक्ष्म भेदांचें व विशिष्ट उपयोगांचें ज्याला चांगलें ज्ञान आहे असा जो मनुष्य योग्य रीतीनें शब्दांचे प्रयोग करतो, तो शब्द-प्रयोग करण्यांत कुशल विद्वान् स्वर्ग लोकांत अक्षय्य जय मिळवितो; पण भलते शब्द योजिले तर मात्र त्याला दोष लागतो.

पण कोणाला बरें हा दोष लागतो ? शब्दप्रयोग जाणणाऱ्याला कां न जाणणाऱ्याला ?—

शब्दप्रयोग जाणणाऱ्यालाच ना ? असें कशावरून म्हणाल, तर ज्याला शुद्ध शब्दांचें ज्ञान होतें, त्यालाच 'हा अशुद्ध शब्द आहे' असें अशुद्ध शब्दाचेंही ज्ञान होतें; आणि ज्याप्रमाणें शब्दज्ञानानें पुण्य लागतें त्याचप्रमाणें अपशब्दज्ञानानें पाप लागतें; त्यांतसुद्धा वास्तविक पाहतां पापच पुष्कळ लागेल; कारण अप शब्द पुष्कळच आहेत, व शुद्ध शब्द असे थोडेच आहेत. एकेका शुद्ध शब्दाचे पुष्कळ अशुद्ध शब्द होतात. उदाहरणार्थ–गौः या शुद्ध शब्दाचे ' गावी ', 'गोणी ', 'गोता ', 'गोपोतलिका' वगैरे पुष्कळ अपभ्रंश होतात. ( तेव्हां हे शब्द-ज्ञानानें व अपशब्दज्ञानानें लागणारे पुण्य व पाप हे शब्दप्रयोग जाणणाऱ्यासंबंधानेंच सांगितलें आहे. ) आतां ज्याला शब्दप्रयोग

कळत नाहींत, त्याचा बचाव मात्र उलट त्याचें अज्ञानच करतें. त्याला पुण्यही लागत नाहीं व पापही लागत नाहीं.

हें म्हणणें योग्य नाहीं. शब्दप्रयोगाचें ज्ञान नसण्यानें पूर्णपणें बचाव होणें शक्य नाहीं. कारण आपण पाहतोंच कीं, न जाणतां का होईना, जो ब्राह्मणाचा वध करतो किंवा दारू पितो तोही जातिबाह्य होतोच. याच रीतीनें वरील " सोनन्तमाप्नोति " या ओळीचा अर्थ करावयाचा म्हणजे पुढें लिहिल्याप्रमाणेंच करावयाचा–" तो शब्दप्रयोग करण्यांत कुशल विद्वान् स्वर्गांत अक्षय्य जय मिळवतो, पण भलतेच शब्दप्रयोग केले तर मात्र त्याला दोष लागतो. " कोणाला दोष लागतो ? ज्याला शब्दप्रयोगाचें ज्ञान नाहीं त्याला; कारण ज्याला शब्दप्रयोगाचें ज्ञान आहे त्याचा बचाव त्याचें ज्ञानच करूं शकतें.

पण हा श्लोक कोठें कोणीं सांगितला आहे ?

भ्राजें[१२] नांवानें प्रसिद्ध जे श्लोक आहेत त्यांपैकींच हा एक श्लोक आहे.

पण, काय हो ? आपणाला श्लोकसुद्धा प्रमाण आहेत का ?

मग त्याला काय हरकत आहे ?

तर, मग, जर हा " यस्तु प्रयुङ्क्ते० " श्लोक प्रमाण आहे, तर पुढील श्लोकही प्रमाण होण्यास योग्य आहे. "तांब्याच्या रंगाच्या दारूनें भरलेल्या घड्यांचें जाळेंच्या जाळें पिऊन सुद्धा जर ( लोकांत ) स्वर्ग मिळत नसतो तर सौत्रामणि नामक यज्ञामध्यें थोडीशी दारू पिऊन स्वर्ग कसा मिळेल ?"

हा श्लोक प्रमाण नाहीं; कारण वेताल माणसांनीं म्हटलेला हा श्लोक आहे. जो श्लोक समंजस पुरुषानें लिहिलेला असतो, तो प्रमाणच असतो.

" अविद्वांसः० " श्लोकाचा अर्थः—प्रत्यभिवादनाच्या[१३] वेळीं ज्या व्याकरण न जाणणाऱ्या गुरुजींना नामांमध्यें प्लुत करून उच्चारण कसें करावें तें माहीत नसतें, त्या गुरुजींच्या पुढें प्रवास आटोपून गेलेल्या शिष्यानें, आपलें नांव न उच्चारतां, जसें स्त्रियांपुढें साध्या शब्दांनीं " हा मी आलों " असा उच्चार केला जातो, तसाच उच्चार करावा. शिष्यांकडून अभिवादन म्हणजे नमस्कार केला जातो, त्या वेळीं स्त्रियांपुढें जसा नमस्कार केला जातो तसा आपल्यापुढें केला जाऊं नये, एवढ्याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

" विभक्तिं कुर्वन्ति " म्हणजे विभक्ति लावतात. याविषयीं खुलासा पुढीलप्रमाणें—याज्ञिक म्हणतात–प्रयाज मन्त्रांचें विभक्ति[१४] लावून उच्चारण करावें. पण व्याकरण म्हटल्याशिवाय प्रयाज मंत्रांना विभक्ति लावून उच्चारण करणें शक्य नाहीं.

" यो वा इमाम्० " याचा अर्थः—" जो ही वाणी प्रत्येक पद, प्रत्येक स्वर व प्रत्येक अक्षर स्पष्ट करून उच्चारतो तो यज्ञ[१५] करण्याला योग्य होतो." तशा रीतीनें आपण योग्य व्हावें, याकरितां व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे.

आतां " चत्वारि० " याचा अर्थ–" ह्याला चार शिंगें आहेत, याला तीन पाय आहेत; दोन डोकीं आहेत. सात हात पण आहेत; तीन ठिकाणीं बांधलेला हा बलवान् वृषभ मोठा शब्द करीत असतो, हा मोठा ( शब्दरूपी ) देव मर्त्यलोकांत प्रविष्ट झाला. " येथें चार शिंगें म्हणजे चार प्रकारचीं पदें–नाम, क्रियापद, उपसर्ग, व निपात. तीन पाय म्हणजे भूत, भविष्य व वर्तमान हे तीन काल; दोन मस्तकें म्हणजे शब्दाचीं दोन स्वरूपें नित्य[१६] व उत्पाद्य; याचे सात हात म्हणजे प्रथमा वगैरे सात विभक्ति; तीन ठिकाणीं बांधलेला म्हणजे छाती, गळा व मस्तक या तीन ठिकाणीं बांधलेला. याला वृषभ म्हटलें आहे; कारण हा इच्छा पूरित करतो; रोरवीति याचा अर्थ शब्द करतो. हा अर्थ कोठून काढतां ? ' रु ' धातूचा अर्थ ' शब्द करणें ' असा आहे. ' महो देवो मर्त्यां आविवेश ' म्हणजे हा मोठा देव शब्द मर्त्यांमध्यें म्हणजे मरण पावणाऱ्या

प्राण्यांमध्यें म्हणजे मनुष्यांमध्यें शिरतां झाला. मोठ्या देवाशीं–शब्दाशीं–आपलें साधर्म्य[१७] व्हावें यास्तव व्याकरणाचें अध्ययन करणें जरूर आहे. '

दुसरे कोणी व्याख्याकार "चत्वारि०" या पदानें "चत्वारि वाक्परिमिता०" हा श्लोक समजतात; त्याचा अर्थ—वाणीचीं मोजकीं चार पदें म्हणजे स्थानें आहेत, जे मनीषि म्हणजे मन ताब्यांत आणलेले विद्वान् ब्राह्मण आहेत तेच तीं चार पदें जाणूं शकतात; कारण चार पदांपैकीं तीन आंतल्या बाजूस खोल ठेवल्यामुळें चकाकत नाहींत; फक्त चवथें पद म्हणजे वाणीचा चवथा भागच माणसें उच्चारूं शकतात.[१८] "चत्वारि वाक्परिमिता पदानि" याचा अर्थ—वाणीचीं मोजकीं चार पदें आहेत; म्हणजे चार प्रकारचीं पदें आहेत—नाम, आख्यात, उपसर्ग व निपात. "तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः" मनीषिणः म्हणजे मनाचे ईश्वर म्हणजे मन व्याकरणाध्ययनानें पूर्ण ताब्यांत ठेवणारे. "गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति"—गुहेमध्यें ठेवलेलीं तीन ठिकाणें हलतचालत नाहींत म्हणजे प्रकाशत नाहींत. "तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति" जें माणसामध्यें वाणीचें स्थान दिसतें, तें वास्तविक चवथा भागच आहे.

"उत त्वः पश्यन्" हा श्लोक—"वाणीचें अध्ययन करून सुद्धा कांहीं लोक वाणी म्हणजे काय हें नीट जाणीत नाहींत; त्याप्रमाणें कांहीं लोक वाणीचें श्रवण करून सुद्धा खरी वाणी ऐकूं शकत नाहींत; पण ज्याप्रमाणें कामसंपन्न भार्या सुंदर वस्त्र नेसून पतीपुढें आपली तनु प्रगट करिते त्याप्रमाणेंच ह्या वैयाकरणाचे पुढें ही वाणी आपली तनु प्रगट करिते. श्लोकाचें पदशः स्पष्टीकरण–एखादा मनुष्य अवलोकन करून सुद्धा पूर्णपणें जाणीत नाहीं. तसेंच एखादा ऐकून सुद्धा खरें श्रवण करीत नाहीं[१९]. कशाचें अवलोकन व श्रवण ? अर्थात् वाणीचें. ह्या श्लोकाचा पहिला अर्धा भाग व्याकरणाचें अध्ययन न केलेल्या माणसाला उद्देशून लिहिला आहे. पुढील अर्धभागांतील "उतो त्वस्मै तन्वं विसस्रे" यांतील तन्वं विसस्रे म्हणजे तनु प्रगट करिते. पुढील "जायेव पत्य उशती सुवासाः" ह्या अर्धभागांत उपमा देऊन अर्थ स्पष्ट केला आहे:—ज्याप्रमाणें प्रेमानें युक्त भार्या उत्तम वस्त्र परिधान करून पतीला आपली तनु दाखविते, त्याप्रमाणें वाणी ही वाणीचें म्हणजे शब्दाचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या माणसाला आपलें स्वरूप प्रकट करिते. वाणीनें आपलें स्वरूप आपणापुढें प्रकट करावें या हेतूनें व्याकरणाचें अध्ययन करावें.

"[२०]सक्तुमिव०" याचा अर्थः—ज्याप्रमाणें चाळणीनें सातू चाळतात त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं विद्वान् लोक बुद्धीनें वाणी शुद्ध करून उच्चारतात, त्या ठिकाणीं एकमेकांचे स्नेहीसोबती, विद्वान् लोक ऐक्य भावनेनें वागतात; कारण त्यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक लक्ष्मीचा निवास असतो." श्लोकांतील सक्तु शब्दाचा अर्थ सातू. 'सक्तु' हा शब्द 'सच्' धातूपासून आला आहे. 'सच्' म्हणजे 'चिकटणें.' सातू हा निर्मल करण्यास कठीण असतो. अथवा सक्तु म्हणजे विकसित होणारा हाही अर्थ होईल व कस् धातूपासूनही वर्णांची उलटापालट करून 'सक्तु' शब्द साधतां येईल. तितउ हें वस्तु निर्मल करण्याचें साधन आहे. तितउ म्हणजे चाळणी. ततवत् म्हणजे पसरल्यासारखी ती विस्तृत असते किंवा तुन्नवत् म्हणजे तिला भोकें भोकें असतात म्हणून तिला तितउ म्हणतात. धीराः म्हणजे मनन करणारे; मनसा म्हणजे बुद्धीनें; 'वाचमक्रत' येथें 'अक्रत' याचा अर्थ 'अकृषत' म्हणजे 'गाळून काढते झाले' असा आहे. 'अत्र सखायः सख्यानि जानते' म्हणजे या ठिकाणीं हे विद्वान् लोक एकमेकांचे स्नेही असल्यामुळें दृढ स्नेह संपादितात. या ठिकाणीं म्हणजे कोठें ? हा जो विकट ( मोक्ष ) मार्ग आहे, जो केवळ ज्ञानानेंच प्राप्य आहे व जो वेदवाणीचा विषय आहे, त्याच्या ठिकाणीं. हे स्नेही म्हणजे कोण ? वैयाकरण. दृढ स्नेह संपादन करतात हें कशामुळें ? उत्तर–'भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधिवाचि' म्हणजे यांच्या वाणीमध्यें कल्याणकारक

लक्ष्मी राहिलेली असते म्हणून.लक्ष्मी ही लक्षण किंवा भासन म्हणजे प्रकाशित होणें या गुणामुळें अज्ञान दूर करण्यास समर्थ असते म्हणून तिला लक्ष्मी शब्द लावतात.

आतां ‘ सारस्वतीम् ’ हें वाक्य घेऊं. याज्ञिक लोक म्हणतातः—ज्यानें गृह्याग्नि पाळला आहे, त्याच्याकडून जर अपशब्दाचा प्रयोग झाला तर त्यानें प्रायश्चित्तादाखल ‘ सारस्वती[21] इष्टि’ करावी. आपणाला प्रायश्चित्ताची जरूर न लागावी म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां ‘दशम्यां पुत्रस्य’ हें वाक्य घेऊं—‘ याज्ञिक लोक म्हणतात, “ दहाव्या दिवसाच्यानंतर नूतन झालेल्या पुत्राचें नांव ठेवावें; नांवाचा आरंभ घोष[22]-वत् व्यंजनानें व्हावा; नांवाच्या मध्यें अन्तस्थ व्यंजन असावें; तें वृद्ध नसावें; तें तीन पुरुषांच्या नांवापैकीं असावें, व तें अनरि असावें म्हणजे माणसांचें नसावें किंवा शत्रूच्या ठिकाणीं प्रतिष्ठित झालेलें नसावें; असें जें नांव तें अत्यन्त प्रतिष्ठित होतें. नांवाचीं अक्षरें दोन असावीं किंवा चार असावीं; तें [23]कृदन्त असावें, तद्धितान्त नसावें. व्याकरणाच्या अध्ययनाशिवाय कृत्प्रत्यय किंवा तद्धितप्रत्यय यांचें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

आतां सुदेवो असि याचा अर्थ :— “ हे वरुणा, तूं खरोखरच देव आहेस. कारण, ज्याप्रमाणें अग्नि पोकळ प्रतिमेंत शिरुन (आंतील मळ जाळून) प्रतिमा शुद्ध करतो, त्याप्रमाणें तुझ्यापासून निघून सात प्रवाह म्हणजे विभक्ति ह्या टाळूप्रत जाऊन तिला प्रकाशित करतात. “सुदेवो असि वरुण” म्हणजे वरुण, तूं सुदेव म्हणजे सत्यदेव आहेस. “ यस्य ते सप्त सिन्धवः ” येथील सप्त सिन्धू म्हणजे सात विभक्ति. “ अनुक्षरन्ति काकुदं” येथील काकुदं या पदाचा अर्थ टाळू. काकु म्हणजे जीभ; ती ज्या भागाकडे नुद्यते म्हणजे फिरवली जाते तो भाग काकुद. “सूर्म्यं सुषिरामिव” हा दृष्टांत दिला आहेः ज्याप्रमाणें पोकळ सुंदरशा प्रतिमेंत अग्नि आंत शिरुन तिचा मळ जाळतो व तिला लखलखीत करतो,त्याप्रमाणें (तुझ्यापासून निघून) या सात विभक्ती टाळूचा भाग स्वच्छ करतात.[24] म्हणून तूं सत्यदेव आहेस. आपण सत्यदेव व्हावें म्हणून व्याकरणाचें अध्ययन करावें.

बरें,पण,व्याकरण पढूं इच्छिणाऱ्यालाच व्याकरणाध्ययनाचे फायदे येथें सांगितले आहेत; दुसरे कांहीं वेद वगैरे अध्ययन करणाऱ्याला वेदाध्ययनाचे फायदे कां सांगितले नाहींत ? फायद्याचा प्रथम विचार केल्याशिवायच वेदाध्ययनाला प्रवृत्त होऊन पाठयामागून पाठ या क्रमानें “शं नो देवीः” वगैरे वेदवाक्यें हजारों लोक पठण करतात; त्यांना कोणी वेदाध्ययनाचे फायदे कां नाहीं सांगत ? पूर्वींच्या काळीं अशी स्थिति होती कीं, उपनयनसंस्कार झाल्यानंतर प्रथम ब्राह्मण व्याकरणाचें अध्ययन करीत; आणि त्यांना तीं तीं निरनिराळीं [25]स्थानें, करणें, नाद वगैरें गोष्टींचें ज्ञान झाल्यावरच वेद शिकवीत; आजची गोष्ट तशी नाहीं. वेदांचें अध्ययन झालें कीं ताबडतोब गृहस्थाश्रमी होऊं इच्छिणारे लोक असे बोलावयाला लागतात—वेद शिकल्यानें आम्हांला वैदिक शब्दांचें ज्ञान झालें व लोकांमधील रोजच्या आमच्या व्यवहारामुळें आम्हांला लौकिक शब्दांचेंही ज्ञान झालें आहे; आतां व्याकरण शिकण्याची कांहीं जरूर नाहीं. अशा तऱ्हेनें भलत्या दिशेनें विचार करणाऱ्या शिष्यांना स्नेहाखातर मित्राप्रमाणें आचार्य[26] पाणिनि ‘हे फायदे आहेत, व्याकरणशास्त्राचें अध्ययन करावें’ असा हेतू मनांत धरून व्याकरणशास्त्र प्रतिपादन करितात.

शब्द कोणता तें सांगितलें; शब्दाचें स्वरूप काय,तेंही पण सांगितलें. शब्दशास्त्र शिकण्यापासून फायदे कोणते, तेंही सांगितलें. आतां शब्दशास्त्र प्रतिपादन करावयाचें, तें कशा रीतीनें करावयाचें ! यच्चयावत् सगळ्या शुद्ध शब्दांचें प्रतिपादन करावें, का सगळ्या अपशब्दांचें प्रतिपादन करावें अथवा शुद्ध शब्द व अपशब्द दोन्ही सांगावे ?

शुद्ध शब्द किंवा अपशब्द दोहींपैकीं एकाचें प्रतिपादन करण्यानें काम भागेल. उदाहरणार्थ– जेव्हां खाण्यास योग्य पदार्थ कोणते तें आपण नियमस्वरूपानें म्हणजे अमुकच असें सांगतों, तेव्हां अमुक पदार्थ खाऊं नयेत अशा तऱ्हेच्या अभक्ष्य पदार्थांच्या निषेधाचें आपोआपच ज्ञान होतें. पांच नखांचे [२७] पांचच प्राणी खावे असें म्हटलें असतां पांचांशिवाय दुसरे पांच नखांचे कोणतेही प्राणी खाऊं नयेत असें आपोआपच समजतें. त्याचप्रमाणें अभक्ष्य पदार्थांचा निषेध केल्यानें भक्ष्य पदार्थांबद्दलही नियम समजला जातो. जसें गांवकोंबडा खाऊं नये, गांवडुकर खाऊं नये, असें म्हटलें असतां रानडुक्कर किंवा रानकोंबडा खाण्यास हरकत नाहीं, असें कळतें. प्रस्तुत स्थळीं सदरहूप्रमाणेंच जर शुद्ध शब्दांचें प्रतिपादन केलें, उदा० जर गौः हा शुद्ध शब्द आहे असें सांगितलें, तर त्यावरून कळून येतेंच कीं, गावी वगैरे बाकीचे अपशब्द आहेत; तसेंच अपशब्दांचें प्रतिपादन केलें, उदा०गावी वगैरे बाकीचे अपशब्द सांगितले, तर त्यावरुन कळून येतें कीं गौः हा शुद्ध शब्द आहे.

या दोहोंपैकीं बरा मार्ग कोणता ?

लघुत्वामुळें शुद्ध शब्द सांगणें हा बरा मार्ग; शुद्ध शब्द सांगणें हें थोडक्यांत भागणारें काम आहे; अपशब्द सांगणें फार मोठें काम आहे; कारण एकेका शुद्ध शब्दाचे अनेक अपभ्रंश असूं शकतात. उदाहरणार्थ, गौः या शुद्ध शब्दाचे गावी, गोणी, गोता, गोपोतलिका वगैरे पुष्कळ अपभ्रंश होतात. शिवाय शुद्ध शब्द सांगण्यानें इष्ट म्हणजे आपल्याला जे शब्द पाहिजेत ते सांगितले जातात.[२८]

बरें, अशा रीतीनें शुद्ध शब्दांचा उपदेश करावयाचा, म्हणजे शब्दज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्दाचें उच्चारण करावयास पाहिजे, होय ना ? 'गौः;' 'अश्वः', 'पुरुषः', 'हस्ती', 'शकुनिः', 'मृगः', 'ब्राह्मणः' वगैरे सर्व शब्द सांगावयास पाहिजेत ना ?

नको असें आम्ही म्हणतों. शब्दांचें ज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्द सांगणें हा कांहीं खरा उपाय नाहीं. असें ऐकिवांत आहे कीं, बृहस्पतीनें[२९] इन्द्राला एक हजार देवांचीं वर्षें प्रत्येक शब्द उच्चारून शब्दशास्त्र सांगितलें, पण शब्द संपले नाहींत. बृहस्पतीसारखा प्रख्यात वक्ता, इन्द्रासारखा चलाख विद्यार्थी, एक हजार देवांचीं वर्षें अध्ययनाचा काल; तरी शब्दांचा अंत सांपडला नाहीं. मग आजकालची गोष्ट कशाला बोलतां ? जो सर्व प्रकारानें निरोगी राहून दीर्घकाल जगतो तो फार तर शंभर वर्षें जगतो. शिवाय, विद्येचा उपयोग चार प्रकारांनीं होतो. गुरुमुखांतून समजून घेते वेळीं म्ह. शिकते वेळीं, मनन करते वेळीं, दुसऱ्यास शिकवते वेळीं आणि व्यवहारामध्यें म्हणजे सभाप्रसंग व यज्ञ यांच्या वेळीं. तेव्हां सर्व शब्दांचें अध्ययन करावयाचें म्हटल्यास सबंध आयुष्य गुरुमुखांतून विद्या शिकण्यांतच खर्च होईल. तेव्हां शब्दांचें ज्ञान होण्याकरितां प्रत्येक शब्द सांगणें हा कांहीं खरा उपाय नाहीं.

तर मग हे शब्द कोणत्या रीतीनें शिकवावयाचे ? सामान्य धर्म व विशेष धर्म यांनीं युक्त अशीं कांहीं सूत्रें सांगावीं म्हणजे थोडक्या श्रमांत मोठमोठया शब्दांच्या राशीच्या राशि शिकवतां येतील.

असें सामान्यधर्म व विशेष धर्म यांनीं युक्त शास्त्र कशाप्रकारचें सांगावयाचें ?

सामान्य नियम व अपवाद या प्रकारचें: एखादा साधारण नियम सांगावा; नंतर त्यास अपवाद सांगावा.

कोणत्या प्रकारचा सामान्य नियम सांगावा व कोणत्या प्रकारचा अपवाद सांगावा ? बऱ्याच ठिकाणीं लागू पडेल असा सामान्य नियम सांगावा. उदा० "कर्मण्यण्" (३।२।१) कर्म उपपद लावलेल्या धातूला कर्ता या अर्थी 'अण्' प्रत्यय लावावा. नंतर त्याला कांहीं विशिष्ट अपवाद सांगावा. उदाहरणार्थ—"आतोऽनुपसर्गे कः" (३।२।३) आकारान्त धातूंना उपसर्ग पूर्वी जोडला नसल्यास कर्ता या अर्थी 'क' प्रत्यय लावावा.

बरें, पण पदांचा अर्थ आकृति म्हणजे जाति असते, का द्रव्य म्हणजे व्यक्ति असते ?

दोन्ही–जाति व व्यक्ति–पदांचा अर्थ होऊं शकतात.

हें कशावरून समजावयाचें ?

दोन्ही प्रकारचीं आचार्य पाणिनींनीं सूत्रें लिहिलीं आहेत त्यावरूनः—पदाचा अर्थ जाति असतो, अशा अभिप्रायानें आचार्यांनीं 'जात्याख्यायामेकस्मिन् बहुवचनमन्यतरस्याम्'' ( १।२।५८ ) सूत्र लिहिलें आहे. पदाचा अर्थ व्यक्ति असतो अशा अभिप्रायानें आचार्यांनीं '' सरूपाणामेकशेष एकविभक्तौ '' ( १।२।६४ ) सूत्र लिहिलें आहे.[30]

बरें;शब्द नित्य आहे कां उत्पन्न होणारा असल्यामुळें अनित्य [31]आहे ?

व्याडि आचार्यांनीं लिहिलेल्या '' संग्रहे[32] '' नांवाच्या ग्रंथांत शब्द नित्य असावा कां अनित्य असावा या प्रश्नाचा प्रामुख्यानें विचार केला आहे. दोन्ही मतांवर दोष काय येतात तेंही तेथें सांगितलें आहे. दोन्ही मतें घेण्यांत उद्देश काय आहेत, तेंही सांगितलें आहे. तेथें निकाल हा दिला आहे कीं, 'शब्द नित्य असो अथवा अनित्य असो, दोन्ही तऱ्हांनीं शब्दशास्त्र लिहावयास[33] पाहिजे.'

पण, भगवान् पाणिनि आचार्य यांनीं सांगितलेलें हें शब्दशास्त्र शब्दाच्या अर्थाविषयीं कोणता अभिप्राय मनांत धरून लिहिलें आहे ?[34]

### सिद्धे शब्दार्थसंबंधे

शब्द, अर्थ आणि त्यांचा संबंध हे सिद्ध असतांना.

पण सिद्ध शब्दाचा अर्थ काय ?

नित्य शब्दाला पर्यायशब्द म्हणून येथें 'सिद्ध' शब्द घातला आहे.[35]

हें कशावरून समजतें ?

अशावरून कीं, सिद्ध शब्दाचा प्रयोग नाश न पावणाऱ्या व न हालणाऱ्या वस्तूंच्याविषयीं केला जातो. उदा० आपण '' सिद्धा द्यौः, सिद्धा पृथिवी, सिद्धमाकाशं,'' (स्वर्ग सिद्ध म्हणजे नित्य आहे,पृथिवी सिद्ध आहे, आकाश सिद्ध आहे,) असें म्हणतों.



पण काय हो ? कार्य म्हणजे उत्पाद्य वस्तूंविषयींही सिद्ध शब्दाचा प्रयोग दृष्टीस पडतो.उदाहरणार्थ आपण म्हणतों, '' सिद्ध ओदनः '' ( भात शिजला ), '' सिद्धः सूपः'' ( वरण शिजलें ), ''सिद्धा यवागूः'' (पेज शिजली. ) तेव्हां कार्य म्हणजे 'तयार झालेला' या अर्थी 'सिद्ध' शब्द जर योजतात तर 'नित्य' याच शब्दाचा पर्याय म्हणून येथें 'सिद्ध' शब्द घ्यावा असें काय म्हणून ! 'कार्य' म्हणजे 'तयार झालेला' या अर्थी सिद्ध शब्द कां घेऊं नये ?

संग्रह ग्रंथामध्यें शब्द नित्य आहे किंवा कार्य आहे असा हाच विचार चालू करून'कार्य' या अर्थाशीं विरुद्ध अर्थ दाखविण्याच्या उद्देशानें सिद्ध शब्दाचा प्रयोग केला असल्यामुळें 'नित्य' या अर्थीच तेथें 'सिद्ध शब्द' आहे असें समजतें; तेव्हां येथेंही त्याप्रमाणेंच 'सिद्ध' शब्द हा 'नित्य' या अर्थीच घातला आहे, असें ठरतें.

अथवा कांहीं ठिकाणीं 'एव' वगैरे दुसरा शब्द घातल्याशिवाय फक्त एकच शब्द घातला तरी निश्चयार्थाचें ज्ञान होतें. उदाहरणार्थ 'अब्भक्षः', 'वायुभक्षः' असें म्हटलें कीं 'फक्त पाण्याचेंच प्राशन करतो, दुसरें कांहीं खातपीत नाहीं,''फक्त वायुभक्षण करूनच राहतो; कांहीं खातपीत नाहीं' अशा अर्थाचा बोध होतो. याच रीतीनें प्रस्तुत ठिकाणीं 'सिद्ध' शब्दापासून 'जो नेहमी सिद्धच आहे, साध्य नव्हे' या अर्थाचा बोध[36] होईल.

अथवा 'सिद्ध' या शब्दांत पूर्वपदाचा लोप केला आहे असें समजावें. ज्याप्रमाणें देवदत्ताला 'दत्त' म्हणतात, किंवा 'सत्यभामा' याऐवजीं 'भामा' म्हणतात, त्याप्रमाणें येथेंही 'अत्यन्त[37] सिद्ध' याऐवजीं सिद्ध शब्द घातला आहे.

अथवा, व्याकरणशास्त्रांत '' अर्थ लावते वेळीं हा अर्थ किंवा तो अर्थ असा संशय आला असतां शास्त्रकारांनीं केलेल्या विशिष्ट व्याख्यानावरून अर्थ ठरवावयाचा असतो, 'संशय आला' या सबबीवर

शास्त्राचा त्याग करावयाचा नाहीं " असा नियम असल्यामुळें येथें सिद्ध हा शब्द नित्य या अर्थाचा आहे असें व्याख्यान करूं.

बरें, पण इतकें विवरणरूप स्पष्टीकरणाची भानगड कशाला वार्तिककारांनीं केली ? सिद्ध शब्द न घालतां एकदम स्पष्टपणें 'नित्य' शब्द कां नाहीं घातला ? नित्य शब्द घातला असतां कोणताही संशय राहिला नसता.

ही सगळी भानगड मंगलाकरितां ? मंगल करण्याकरितां प्रवृत्त झालेले आचार्य वार्तिककार वार्तिकपाठरूपी मोठया शास्त्रप्रवाहाच्या सुरवातीला मंगल म्हणून सिद्ध शब्द घालतात. सुरवातीला मंगल करून लिहिलेले शास्त्रग्रंथ प्रसिद्धीस पावतात, त्यांचें श्रवण करणारे शिष्य शूर होतात, दीर्घायु होतात, थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे अध्ययन करणाऱ्या शिष्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात.

शिवाय वार्तिककारांनीं सिद्ध शब्दाच्या ऐवजीं नित्य शब्द घातला असता तरी काम भागलेंच असतें, असें नाहीं. कारण 'नित्य' शब्द जशाचे तसे राहणारे व ज्यांचें स्वरूप बदलत नाहीं अशा तऱ्हेचे जे पदार्थ असतात त्यांजविषयींच उपयोगांत येतो असें नाहीं; तर पुनः पुनः या अर्थींही नित्य शब्द वापरला जातो. उदा० 'नित्यप्रहसितः', 'नित्यप्रजल्पितः' ( पुनः पुनः हंसणारा, पुनः पुनः बडबड करणारा ) तेव्हां नित्य शब्दाचा ' पुनः पुनः ' असाही अर्थ आहे; म्हणून नित्य शब्द उच्चारला, तरी "अर्थ लावते वेळीं संशय आला असतां विशिष्ट अर्थ शास्त्रकारांनीं केलेल्या व्याख्यानावरून घ्यावयाचा असतो. संशय आला म्हणून शास्त्र अनर्थक ठरवावयाचें नाहीं " हा नियम मनांत घेऊनच त्या नित्य शब्दाचा अर्थ ठरवावा लागेल. तेव्हां आचार्य विचार करतात– " मंगलाकरितांच सिद्ध शब्द आरंभीं घातला जाऊं द्या; त्याचा अर्थ नित्य आहे असें आपण व्याख्यानानें सांगूं शकूं." तेव्हां मंगलाकरितांच सिद्ध शब्द घातला आहे. नित्य शब्द घातला नाहीं.

बरें, कोणता पदाचा अर्थ ( जाति कां व्यक्ति ) समजून ' शब्दार्थसंबन्धे ' ह्या समासाचा शब्द, अर्थ व संबन्ध हे नित्य असतांना असा विग्रह करावयाचा ?

आकृति म्हणजे जाति हा अर्थ समजून तसा विग्रह केला आहे.

हें कशावरून ?

आकृति नित्य असते; द्रव्य अनित्य असतें म्हणून.

बरें, पण द्रव्य म्हणजे व्यक्ति हा पदाचा अर्थ समजला, तर विग्रह कसा करावयाचा ?

शब्द व त्याचा अर्थाशीं संबंध नित्य असतांना असा विग्रह करावयाचा[३८]. कारण शब्दांचा म्हणजे वाचकाचा अर्थाशीं संबंध ( ज्याला शक्ति म्हणतात तो ) नित्य असतो, म्हणून शब्द व अर्थसंबंध हा सिद्ध असतांना असा विग्रह करावयाचा. अथवा पदाचा अर्थ द्रव्य घेतला तरी वरील विग्रह 'शब्द, अर्थ व संबन्ध ' हे सिद्ध असतांना हा योग्य होईल. कारण, वास्तविक पाहतां द्रव्यच नित्य असतें; आकृति[३९] अनित्य असते.

हें कशावरून कळतें कीं, द्रव्य नित्य असतें व आकृति अनित्य असते ?

लोकांत नेहमीं दृष्टीस पडतें कीं, मातीलाच एक विशिष्ट आकृति दिली, कीं ती पिंड म्हणजे गोळा बनते; पिण्ड आकृति मोडून टाकून लहान लहान घागरी केल्या जातात;घागरींची आकृति मोडून कुंडया केल्या जातात,त्या मोडून लहान मडकीं केलीं जातात.

तसेंच, सोनें घ्या, त्याला विशिष्ट आकृति दिली म्हणजे तो गोळा होतो; गोळा ही आकृति मोडून त्याचे रुचकें[४०] करतात; रुचक मोडून कडीं करतात; कडीं मोडून स्वस्तिकें[४१] करतात; पुन्हा त्याचा सुवर्णाचा गोळा बनवितां येतो आणि त्याला निराळा एक आकार देऊन त्याचीं खैराच्या निखाऱ्यासारखीं लाल लाल दोन कुंडलें करतां येतात. एकंदरींत काय, दोन्ही उदाहरणांवरून स्पष्ट होतें कीं, आकृति बदलते

